# भोंडला-भुलाबाई



संपादिका: डॉ. सरोजिनी बाबर

# भोंडला - भुलाबाई

संपादिका

**डॉ. सरोजिनी बाबर**

अध्यक्ष

महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती

**महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य माला, पुष्प २२ वें**

## महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती

**अध्यक्ष :** डॉ. सरोजिनी बाबर

**सभासद :** प्रा. वामनराव चोरघडे
सौ. कुमुदिनी पवार
श्री. टी. जी. देशमुख
प्रा. जयंतराव पाटील
श्री. स. आ. सप्रे
डॉ. यू. म. पठाण
प्रा. वसंत दावतर
प्रा. सुमन पाटील
श्री. शंकरराव खरात
श्री. नामदेवराव व्हटकर
श्री. ना. धों. महानोर
श्री. शंकर खंडू पाटील

**सचिव :** शिक्षण उपसंचालक, पुणे

# अनुक्रमणिका

# प्रास्ताविक

आपल्या घरच्या मुलीबाळींचे घुंगूरते घराद्वारातून फिरायला लागले म्हणजे कुळाचाराच्या सोपस्कारानं भारंसूद झालेल्या चालीरीती घरोघरी सुरू होतात. मुलीबाळींना पोटभर खेळायला मिळावं, एकमेकींच्या संगतीतील सहजीवन जगता याव आणि मनसोक्त गीतं गात खुशालीत येऊन हसणं खिदळणं शक्य व्हावं म्हणून पश्चिम महाराष्ट्रात **भोंडला–हादगा** खेळायला मिळतो, तर विदर्भ–खानदेशात **भुलाबाई** पुजायला मिळते. एखाद्या सणवाराप्रमाणं या पूजेच्या निमित्तानं व खेळाच्या कारणानं घरोघरी आनंदोत्सव निघतो. गोडधड शिजतं. मुलीबाळींना विविध प्रकारच्या **खिरापती** मिळतात आणि देवदेवतांची महापूजा बांधली जाते. अशावेळी गाईली जाणारी गीतं फारच बहारीची असून त्यांचेसाठी वापरात असणारी स्वररचनाही अपूर्वाईची असते.

आपल्या वाजत गाजत होतेल्या मुसळधारीनं उभ्या दुनियेचं लक्ष वेधून घेणारा हस्ताचा पाऊस या महापूजेला मानापानाचा मानला जातो.

मराठी मुलखाच्या शहर विभागातून या वेळची ही महापूजा भोंडला या नावानं तर ग्रामीण विभागातून हादगा या नावानं ओळखिली जाते. या पूजेच्या मानकरणी असतात त्या त्या घरच्या परकरचोळीतील पोरीबाळी.

भोंडला अगर हादगा खेळताना आमोरा समोर उभ्या असलेल्या हत्तीचे चित्र काढण्यात येते. या हत्तींच्या सोंडेत फूलमाळ असते. भिंतीवर हत्तीचं

हे चित्र रंगीबिरेंगी चितारलेलं असतं तर रोजच्या खेळगीतासाठी वापरात येणारं चित्र लाकडी पाटावर रांगोळीनं अगर खडूनं काढलेलं असतं.

या हस्त नक्षत्राच्या काळात निसर्गात तरारून वर येणारी झेंडू मखमलीची व कोरांटीची फुलं या हादग्या देवाला घालावयाच्या माळेसाठी निवडण्यात येतात. शिवाय त्यावेळी उपलब्ध असणाऱ्या वांगं, दोडका, घोसाळी, भेंडी, पडवळ, कारली, मिरची, काकडी इत्यादी फळ भाज्यांची व पेरू, सिताफळ, डाळिंब असल्या फळांची माळही या हादग्या देवाच्या गळ्यात घातली जाते.

रोज सायंकाळी पाटावर काढलेल्या हत्ती भोवती फेर धरून मुली निर-निराळी गीतं म्हणतात. जुन्या काळच्या बालवयातील सासर माहेरची हकीकत ही गीतं सांगतात. त्यामुळं गीतं गाताना पोरीबाळी एकापेक्षा एक चढ वाटावेत असे अनुभव सांगणाऱ्या गीतांचा आळीपाळीनं व चढाओढीनं उपसा करीत रहातात.

अशावेळी वडीलधाऱ्या बायकांकडून नवीन नवीन गीतं शिकवली जातात व रोज रोज ओळखू येऊ नयेत अशा पदार्थांच्या चवीष्ट खिरापतीही तयार केल्या जातात.

हा उत्सव सोळा दिवस चालतो. हस्ताचा पाऊस मानवी जीवनात नव-चैतन्य निर्माण करीत असल्यानं हा उत्सव फार मानाचा मानला जातो. अश्विन मासाच्या वैभवाचा समजण्यात येतो.

पश्चिम महाराष्ट्रात जसा हादगा भोंडला साजरा होतो तसाच वऱ्हाड खानदेशात भुलाबाईचा उत्सव मोठ्या डामडौलानं पार पडतो. भादव्यातील पोर्णिमेपासून भुलाबाईची पूजा अश्विनी पोर्णिमेपर्यंत चालते हे या पूजेचं वैशिष्टय होय.

भुलाबाई म्हणजे पार्वती. भुलोबा म्हणजे शंकर. शंकर पार्वती म्हणजे देवाधिदेव. कैलासी त्यांचं वास्तव्य. लोकांचं भलंबुरं पहावं हा त्यांचा गुणधर्म. अडल्या नडल्यांचे ते आधार. गोरगरिबांचे वाली. म्हणून त्यांची महापूजा बांधावयाची ही या उत्सवाची मूळ बैठक आहे.

आरास केलेल्या घरातील दिवळीत भुलोबा व भुलाबाई यांची मातीची चित्रे मांडतात. या चित्रांची फळाफुलांनी पूजा करतात आणि कोजागिरीला त्यांचं विसर्जन होतं. यावेळी फराळाचं करून मुलींना हळदीकुंकू दिलं जातं.

भुलाबाईची गीतं भुलाबाईच्या जीवनातील कित्येक मजेदार गोष्टी सांगून जातात. सासर माहेरच्या तुलनेनं रंगतात. त्यामुळं हादग्याप्रमाणं याही गीतांनी घरोघरीची अंगणं सजून उठतात. घरोदारी उत्साहाचं वारं पेरून टाकतात.

म्हणून लोकसाहित्य समितीनं 'भोंडला-भुलाबाई'ची गीतं संग्रहित करून ती प्रकाशित करण्याचा विचार केला. बरेच दिवस ती गीतं मिळविण्याची खटपट केली. अनेकांकडून तगादा झाल्यानं या आंतरराष्ट्रीय बालक वर्षात ती मुलीबाळींच्या हाती देण्याचा विचार केला.

त्यामुळं अनेकांच्या परिश्रमानं तयार होणारं हे पुस्तक जनलोकांच्या हाती देताना लोकसाहित्य समितीस मोठा आनंद होत आहे. परंपरागत उत्सवांचा हा वानवळा आंतरराष्ट्रीय बालक वर्षात आम्ही बालचमूच्या हाती देऊ शकलो यातला आनंद आगळा आहे.

या पुस्तकाचं अंतरंग व मुखपृष्ठ सजवणारे चित्रकार श्री. ग. ना. जाधव व या पुस्तकासाठी गीतं पाठवणारे विविध संग्राहक यांची लोकसाहित्य समिती ऋणी आहे.

महाराष्ट्र शासनाच्या मध्यवर्ती मुद्रणालयाचे संचालक, श्री. स. आ. सप्रे व त्यांचे सहकारी यांनी हे पुस्तक तयार करताना घेतलेले परिश्रम उल्लेखनीय आहेत. त्यांचेही मनःपूर्वक आभार.

पुणे,
१५ ऑगस्ट १९७९.

अध्यक्ष,
महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती



सख्यांना बोलावीते हादगा देव मी पुजीते....

# हादगा-पावणा

कडाडत्या विजेला, दणाणत्या आभाळाला न् गरजत्या पावसाला धमकावीत आमच्या घरापासून त्या तिथं खाईल्या अंगाला दिसतेल्या मामांच्या वाड्याला कधी जाईन असं मला त्या दिवशी झालेलं !... मामांनी आणलेली नवी जरी साडी नेसून पोरींच्या घोळक्यात मिरवीत मला भोंडला खेळायचा होता. म्हणून सकाळी उठल्या पासूनच आई सांगेल ती सगळी कामं वेचीत माझे पाय भुईला ठरत नव्हते. तरी मेलं काम म्हणून संपतच नव्हतं !... एका मागून एक दत्त म्हणून पुढं उभ्या रहाणाऱ्या कामाला अशी काय बरकत आलीवती की, माझ्या कोवळ्या जिवाचा त्या ओझ्याखाली पार चोळामोळा होऊन जावा ! ... पण तसं काय वाटू नये म्हणून रात्री तापवलेलं दुधाण्यातलं दूध गरम करून ते आत्तीला विरजायला लावीत न् मधूनच शिपीनं खरवडलेली दुधाण्यातली खरवड चवीनं खात मी संतुष्ट झालेवते. वेणीफणी करून वेणीला खुळखुळता चांदीचा रेशमी गोंडा घातलावता. काजळ कुंकू ल्यायलेवते. हिंगण मिट्टयानं धुऊन लख्ख केलेला झबला पोलका घातलावता. रिठ्यानं धुऊन चकचकीत केलेल्या बुगड्या न् झुबे घातलेवते. गळ्यात वज्रटीक न् बोरमाळ ल्यायलेवते ... म्हणून सगळ्या पोरींच्यात ऐटी मारायला कधी जाईन असं झालंवतं. तर मेल्या पावसानं चांगलाच डाव साधलावता. वाजत गाजत येतेल्या पावसानं सुपानं ओतीत यावं तरी किती मी म्हणते त्या दिवशी ? पार मागची पुढची दारं ओलीचिंब करीत पाऊस पावणं घरात आलं ते ? ... असं असून देखील

पोत्याची खोळ अंगावर घेत मी घराबाहेर पडायला निघणार तर आत्तीनं नव्या बाळाला कुंचीत गुंडाळून माझ्या मांडीवर देत त्याला खेळव म्हटलं घटकाभर न् स्वत: बाळाला कुरवाळून त्याच्या मऊ मऊ गालावर हात फिरवीत लागली की मला गीत शिकवायला ! . . .

**एवढं एवढंसं पाखरू माझं**
**लाल लाल ग त्याची चोच**
**गुंजावणी ग त्याचे डोळे**
**सप्त पाताळी बाळ खेळे की, पाखरू माझं . . .**

त्या गीताचं हे तोंड ऐकलं मात्र न् आनंदानं माझ्या अंगावर काटा फुलला ! . . . माझा जीव एकदम मोहरून उठला. माझ्या मांडीवरचं बाळ खरंच असलं गोजिरवाणं होतं. एवढं एवढंसं. लालचुटूक ओठांचं. गुंजावणी डोळ्यांचं. आमच्या थोरल्या चुलत भैनाईचं. मी त्या बाळाचे भराभर मुके घेतले न् आत्तीला म्हटलं की, पुढचं गीत पुन्हा बोल. त्या सरशी तिनं मला त्या गीताचा पुढचा भाग सांगितला . . .

**कोण्या बाजाराशी गेलं**
**कोण्या नारीनं खुणाविलं की, पाखरू माझं . . .**

पण त्यातलं मला काहीच उमगलं नाही. एवढ्याशा बाळाला बाजारात कोण नेईल न् कोण मेली त्याला इकडं चल तिकडं चल म्हणून नजरेनं खुणावील नाही का ? म्हणून मी बोललेच नाही. बाळाला दृष्ट होऊ नये म्हणून बरीक त्याच्या डोळ्यातल्या काजळानंच माझं बोट माखीत न् त्याच्या कपाळावर, गालावर न् उजव्या हातापायाच्या पंज्यांवर काजळाच्या टिकल्या लावीत मी पुटपुटले, "आल्या गेल्यांच्या, देखल्या बघितल्यांच्या, भुताखेतांच्या, वाईट

वंगाळांच्या डोळ्यात खैराखुट्टांची राख पडू दे…" आणि आत्ती आपल्यासंगं गीत म्हण म्हटली तर तिच्या सुरात मी आपला पण सूर घालून दिला…

दह्या दुधांनी भरल्या वाट्या
वर साखर रायपुरी
माझा जेवणार नानापरी की, पाखरू माझं…

मला या गीतातला हा भाग पसंत पडला. गोकुळातल्या कृष्णदेवागत आमचा बाळ दहीदूध भरपूर खाऊन मोठ्ठा होऊ दे म्हणून मी त्याचा घट्ट पापा घेतला. मी ह्या बाळाला भातुकलीतला झक्कास सैंपाक करून वाढीन म्हटलं न् त्या गीताला पुढं केलं…

दुधा तुपांनी भरल्या वाट्या
वर साखर रायपिठी
माझा जेवणार जगजेठी, की पाखरू माझं…

लोण्या ताकांनी भरल्या वाट्या
वर साखर चवीयिला
आला गोविंद जेवायला की, पाखरू माझं…

आणि बाई जिवाला त्या नादात असा उल्हास चढला की, बाळाचा मुटकुळा तसाच पोटाशी धरून मी उठले न् सैंपाक घरात जाऊन शिक्यावरच्या लोण्याकडे पाहिलं, तेव्हा जीव खाली पडला. तिथल्या पाटावर बाळाला निजवून मी ते लोणी काढून खाल्लं न् दुधाण्यातलं दूध पण घुटकलं तशी एकदम हुषारी आली! … पण आत्तीनं बाळाला मी खाली निजवलं म्हणून माझ्या पाठीत रपाटा घातला न् चोरून दूध प्याले एवढ्यासाठी

माझे कान वीतभर लांब होस्तोवर ओढीत मला सांगितलं, "भोंडल्याचं गीत हे. ध्यानात घे न् म्हण आजूळात जाऊन झोकात ! . . ."

"खरंच ? . . ." लोण्यानं माखलेली बोटं चाटून पुसून खात मी आत्तीकडं आश्चर्यानं पाहिलं. दुसरी चोरी उघडकीला आली म्हणताना तिनं मला आणखी दणकली न् त्या गीताचा पुढचा भाग ऐकवला . . .

हस्तिदंती ग आणा फणी
जावळ विंचरूनी घाला वेणी की पाखरू माझं . . .

सोनियाचा ग पाळयीणा
मोतीयाची ग लावली दोरी
पुढं हलवीते राधा नारी की पाखरू माझं . . .

त्यामुळं ते सगळं गाणं मी तिच्याकडून म्हणून घेत तोंडपाठ केलं न् बाळाला पाळण्यात निजवून त्या घटकेला आजोळघरी पळून गेले . . .

तर त्यावेळी आमच्या मामांची धाकली कमळी कोरांटीच्या फुलांचा हार गुंफीत बडबडत होती . . .

हरीच्या नैवेद्याला केली
जिलबी बिघडली
त्यातली एवढीशी उरली मळी
त्याची केली बुंदी कळी
तुपात तळली साखरेत घोळली
जिलबी बिघडली . . .

म्हणून मी खिरापतीचेच बारा वाजले या भीतीनं तिला घाबऱ्याघुबऱ्या विचारलं, "आज जिलबीची खिरापत होती का? . . ." तशी ती "हो" म्हणाली न् घरात जिलबी जमतच नाही असं सांगून पुटपुटली, "तुझा तेवढा लाड ग या घरात? . . . आम्हाला विचारतो कोण?"

"काय झालं?" जिलबीचं गाऱ्हाणं ऐकून कोमेजून गेलेल्या तिला मी विचारायचं म्हणूनच केवळ विचारलं आणि घरात पळाले. बघतेय तर घरात बुंदीच्या कळ्या मामी तळतेली न् तिच्या भोवती कळ्या पाडायचे झारे पसरलेले! . . . कळ्यांचा खमंग वास आला तशी जिभेला पाणी सुटलं न् मी मामीच्या पुढ्यात फतकल मारीत तिच्यापुढं प्रश्न टाकला, "जिलबी खरंच बिघडली मामी खिरापतीची?"

मामी मला बघून हसली. तिनं आपल्या खरकटचा हातानं पदर घेतला न् मला सांगितलं,

"कमळीला जिलबी पाइजे. आणायची कुठली? घरात थोडीच करणार कोण? . . . विकत आणाय तुमचे मामा नको म्हणाले . . ."

"मग हे लाडू कशी करायला बसलीस?" मामीला मी उगीचच खुलासा मागितला. त्यामुळं ती मुरकली न् दाताखाली पदर धरून म्हणाली, "भाची पाईजे लाडकी तर मग नको करायला? भोंडला झक्कास झाला पाईजे म्हटला न्हवता तुमी? . . . आज पैली माळ तर हूंदे दणका! खिरापतीचा पण बेत झक्कास करू."

आता मला कमळीच्या ठसक्याचा खुलासा झाला. मी तशीच पुढच्या दाराला गेले न् मुकाटचानं कोरांटीच्या फुलांचा हार गुंफायला लागले. तशी कमळीला राग आला, "तुझंच का ऐकतात आमचे बाप्पाजी? माझं का नाही?"

"तूं जा तुझ्या मामांकडे. ऐकतील." मी खरं वाटलं ते बोलून गेले. पण त्यामुळं कमळी फुरंगुटून पुटपुटली, "आमचं आजोळ लांब गावाला आहे. तुझं इथल्या इथं. गावात! म्हणून नखरा तुझा! . . ." आणि तिनं आजच्या भोंडल्याला आपणच पहिलं गीत बोलणार असं मला दटावीत त्या गाण्याचा उरला भाग आपल्या सुरेल आवाजात माझ्या पुढं फेकला. . .

त्यातला एवढासा उरला पाक
त्याचा केला साखरभात
तुपात तळली साखरेत घोळली
जिलबी बिघडली
त्यातलं एवढंसं उरलं पीठ
त्याचं केलं थालीपीठ
तुपात तळली साखरेत घोळली
ज़िलबी बिघडली

गाणं संपलं तशी कमळी हसली. हार गुंफता गुंफता उठली न् मला जोरानं खेचीत म्हणाली कशी, "चल चल! आपण परसदारी जाऊया."

"कशाला?" उठता उठता तिनं धरलेला माझा हात सोडवून घेत मी तिला विचारलं. पण ती बोललीच नाही. म्हणताना तिच्या मागोमाग मीही गेले . . . पहातेय तर कमळी आईवर खेकसतेली, "कित्ती खमंग वास येतो बाहेर. ख़िरापत ओळखतील अशानं चटकन पोरी! . . . लौकर आवर!"

मला वाटलं या उप्पर मामी काही बोलील. पण नाही. ती नुसती हसली न् खेळा जावा म्हणाली. आम्ही मग सगळ्या घरातून उगीचच भिरीरा

भिरभिरलो. या दारातून त्या दारात घुसत एकीमागं एक अशा लपंडाव खेळावा तशा पळालो . . .

तेवढ्यात आजी डोईवर गाठोडं घेऊन रानातून आली न् तिनं आमच्या पुढ्यात झेंडूच्या फुलांसकट कोवळी वांगी, दोडका, घोसाळं, भेंडी, पडवळ, सीताफळ, कारलं, काकडी, मिरची, दुध्या भोपळा, साधा भोपळा, मुळा, गाजर, तोंडलं, केवडा, मक्याचं कणीस असलं काय काय सोडून मोकळं करीत त्यांचा हादग्याला हार गुंफा म्हटलं . . . कमळी वाऱ्यागत पळाली न् चांगला दणकट दोरा घेऊन आली. आजीनं मग स्वतःच प्रत्येक जिन्नस गाठ मारून गुंफीत तो हार बराच वेळ एका जागी बसून तयार केला . . .

त्यावेळी आमचं गाणं चुकतंय का येतंय ते बघ म्हणत आम्ही दोघी आजीपुढं येऊन एकमेकींकडं बघत एक गाणं म्हणीत नाचत सुटलो . . .

काळी चंद्रकळा नेसू मी कशी
गळ्यात हार बाई वाकू कशी
पायात पैंजण चालू मी कशी
बाहेर मामाजी बोलू कशी
दमडीचं तेल मी आणू कशी
दमडीचं तेल बाई आणलं
सासूबाईचं न्हाणं झालं
वन्संबाईची वेणी झाली
मामांजीची दाढी झाली
उरलेलं तेल बाई झाकून ठेवलं

लांडोरीचा पाय लागला
वेशीपातूर ओघळ गेला
त्यातनं हत्ती वाहून गेला . . .

आणि आम्हीच खदखदून हसू लागलो . . . आमच्या मामांच्या ते कानावर गेलं न् चिलीम ओढता ओढता बाहेर येऊन ते मला म्हणाले, " मंजुळे, खिरापत पटली का आजची तुला ?" तशी मी खाली मान घालून एका कोपऱ्यात उभी रहात "हो" म्हणाले. मामांनी मग आम्हाला घरात नेलं. आमच्या दोघींच्या हातावर एकेक नवी जरीकाडी असलेली चिरडी ठेवली आणि गावाहून आणलेल्या पिवळ्या रंगीत अशा नकटया नाकाच्या भावल्या न् झोकदार उतरंडी देऊन त्यांनी मामीला सांगितलं, " बरं का, . . . मंजुळाला न् कमळीला लाडू दे पैला न् मग त्येंचं पोट कचकून भरल्यावर खिरापतीचं बगा . . . जिलबी पण मिळंल परवा तेरवा कवा तरी हं ! सांगून आलूया मी ! . . ."

हे ऐकून आम्ही तीन ताड नऊ माड उडालो न् एकमेकींच्या अंगावर पडून एकमेकींचं अंग घुसळीत अशा काय खिदळलो की, ज्याचं नाव ते ! . . . त्या नादात भिंतीवर हादग्याचं रंगीत चित्र लावायचं राहिलं न् रांगोळी पण घरातून हुडकून काढायला झालंच नाही ! . . .

रीतिरिवाजाप्रमाणं पाहिजे तशी हातग्याची पूजा होऊन पहिला दिवस झक्कासपैकी साजरा झाला आणि खिरापत न ओळखता हार खात, ती उत्तम होती म्हणून गाजावाजा झाला तरी काही केल्या त्या रात्री मला झोपच आली नाही. कानात सारखी गीतंच घुमतेली न् उद्याला कोणतं नवं गीत म्हणायचं हाच ध्यास लागलेला. त्या कारणानं मध्यान रात्र उलटून गेल्यावरही इकडच्या आजीच्या उशाशी बसून मी जेव्हा चिमणी वर केली आणि . . .

पानपुडा की शंकरचुडा की शंकरचूडा
मामा माझा की लेकुरवाळा की लेकुरवाळा ...

त्यानं आणली की तेलंग साडी की तेलंग साडी
नेसुन गेले मी बुरजावरी की बुरजावरी ...

हे गीत बडबडत सुटले, तशी माझ्या आवाजानं जागं झालेलं सगळं घर मला खदखदून हसलं न् आईनं रागं भरावं त्या आवाजात, "आता गप नीज म्हणं!" असा दम भरला. त्यासरशी जीभ चावीत मी बसलेवते ती खाली निजले आणि आता कोणी काही म्हणू नये या धास्तीनं तोंडावरून पांघरून ओढलं ... आजीनं तिनं मला घातलेल्या टोपडचाचे बंद घट्ट आवळावेत म्हणून माझ्या पांघरूणात हात घातला तशी मी तो झिडकारून लावला. टोपडं पण काढून टाकलं ... मला झोप येतच नव्हती तर केस विसकाटायचा प्रश्नच कसा उभा रहात होता? माझ्या मनात भोंडला, ओळखीतल्या पोरी, मामांनी आणलेली चिरडी, गीतं न् खिरापत या शिवाय काही एक येतच नव्हतं त्याला मी काय करू?... मघा मी बडबडलेल्या गीतातला...

त्याच्या घरी की दुभतं काही की दुभतं काही
मामा पाहुणा आला बाई की आला बाई
त्याला जेवायला काय काय करू की काय काय करू
त्याला जेवायला साखर उंडे की साखर उंडे
मामा सांगे की मामी भांडे की मामी भांडे ...

हा भाग एकसारखा कानात न् मनात रूंजी घालीत होता. माझ्यापेक्षा कमळीची जिलेबीची खिरापत उत्तम झाली पाहिजे या इर्षेनं मामी

मामाच्यासंगं भांडली असेल हे खरं वाटल्यानं उगीचच जीव वाराहुरा झाला होता. आता आपल्यापेक्षाही कमळीची ऐटी होईल या कल्पनेनं तिच्याएकीचा हेवा उफाळून वर येत होता ! . . . असं काय व्हायलाच नको असं मनापासून वाटत होतं. म्हणून त्या गीतातला पुढचा असा दुसरा भाग मी पांघरूणातूनच गुणगुणला देखील ! . . .

तिथं हरपली इरुद्या जोडवी की इरुद्या जोडवी
सासूबाईना कळू गेलं की कळू गेलं
चार चार चाबूक चमकाविले की चमकावीले
ते बाई चाबूक दूरच्या दूर की दूरच्या दूर
माझं माहेर पंढरपुर की पंढरपूर
माझं आजूळ रत्नांगिरी की रत्नांगीरी
रत्नांगिरीच्या बांगड्या साध्या की बांगड्या साध्या
येता जाता की खुळखुळ वाजे की खुळखुळ वाजे

आजीनं हे ऐकलं न् भस्‌दिशी माझं तोंडावरचं पांघरूण ओढून काढीत म्हणाली कशी, "आता बास न्हाई झाला का भोंडला तुजा ? गप निजतीस का बोलवू तुज्या बाला ? . . ."

त्या उप्पर बोलायची सोय नव्हती. आमच्या बाप्पाजींना असला भोंडला-बिंडला फारसा खपत नव्हता. शाळा जास्त शिकावी हे त्यांचं म्हणणं होतं. म्हणून आमच्या घरातला भोंडला असा आजोळी गेला होता ! . . . मामा-मामींना न् तिकडच्या आजीला त्यात कवतिक होतं ! . . . माझे लाडकोड तिकडं भागविले जायचे ते मीच मागं सरस्तोवर अशा रीतीनं . . .

घरातला कुणाचा राग आता आणखी वर यायला नको म्हणून मी चट्किनी उठून आजीच्या उशाखालच्या तपकिरीच्या डबीतली चिमूट काढून ती ओढली न् थडाथड शिंकत सुटले!...तशी आईनं माझ्यावर तोंड सोडलं, "घालू का एक रपाटा न् मोडू का पेकाट?...गप निज म्हटलं तर लईच लावलंय हं? द्वाड कुठलं!...एक नाद घेतला की तो एकच! ... जगात पोरी भोंडला खेळतात का तुजाच तेवडा तेगारा?..."

पण मी हे ऐकलं न ऐकल्यागत केलं आणि मुकाटद्यानं गप्प गप्प होत निजले. येतेल्या शिंकेला देखील नाक दाबून धरीत बाहेर येऊ दिली नाही का हूं का चूं सुद्धा केलं नाही! ... छट्! निजायचंच आता म्हणून निजले न् नीजबाईनं पण मग मनावर घेतलं! ...

दुसऱ्या दिवशी सकाळी मी उठले, तर आमच्याच परसदारी शेजार-पाजारचे पारवे घुमतेले न् त्यांच्या जोडीला पक्ष्यांच्या किलबिलाटानं अंगण डोक्यावर घेतलेलं. म्हणून घाई घाईनं अंथरूणाच्या बाहेर येऊन परस-दारी पहातेय तर गुलाबाच्या ताटव्याशेजारच्या मखमलीची न् शेवंतीची फुलं तोडीत हादग्याचं गीत रंगलेलं! ...

डेरा ग डेरा मांडीला अवधानी
त्या बाई डेऱ्यात कायसंसं घुमतं
घुसळण घुसळी राधीका गवळण
तिकडून आले कृष्णाजी दातार
कृष्णाजी कृष्णाजी दान देवावं
निळ्ळ्या घोडीव बसूनी जावावं
निळ्ळी घोडी वाकली
सखुबाई सुंदर हासली

सखुबाई तुमच्या अंगणी
सुंदर चाफा लावूनी
ऐसा चाफा फुलला
चला बाई कळ्या तोडायला
आम्ही बाई कळ्या तोडील्या
आम्ही बाई हार गुंफीले
हारा हारा चाफेळी
रात्र झाली गोकूळी

तर ते बघून मी वाघासारखी त्या पोरींच्यावर झेपावले न् आमची फुलं आम्हाला पाहिजेत म्हणून त्यांच्या हातातल्या परड्यांना हात घातला ! . . . त्यासरशी पोरींनी परड्या पाठीमागं धरीत " देत नाही जा ! " म्हणून मलाच दम भरला न् "एवढ्या वेळ कशाला निजलीवतीस ?" असं विचारीत वेडावणं दाखवलं. मला मग भलताच राग आला. पायाखालचे खडे उचलून मी भिरीरी एकेकीच्या अंगावर फेकले न् रडून ओरडून आमच्या घरासकट उभी आळी अंगणात गोळा केली . . .

पण फुलं घेऊन पोरी गेल्या त्या गेल्याच न् मला मात्र सगळ्यांनी हसून वेड्यात जमा केली ! ठिपकत्या वळचणीगत माझी नजर पाणावली . . . नाक मुठीत धरून माघार घ्यावी त्या रीतीनं प्रत्येकाची बोलणी खात मी मुकाट्यानं घरात आले . . . मामांच्या घरी मला दांडगा हार घेऊन जाईन म्हणून केलेला बेत ढासळला, म्हणून झालेल्या हिरमोडाला सावरीत दात घासले. वेणीफणी केली. आंघोळीला गेले. आडाची कळशी ओढीत ओढीत आंघोळ लांबवली ती दहा पंधरा कळशा अंगावर घेत ! . . . तशीच बसले आडाच्या रहाटापुढं कितीतरी वेळ हाराच्या घोकण्या घालीत ! . . .

तेवढ्यात आमची आत्ती शेताला गेलीवती ती सिताफळांची पाटी डोईवर घेऊन आली न् माझं हे ध्यान बघून तिनं मला सुनावलं, "अशानं आजारी पडायचं हाय काय मंजुळेऽऽ ऊठ. पहाटंला मी फुलं काढून ठेवल्यात. हार कर जा बिगीनं न् आज खिरापतीला ही शेलकी शिताफळं नेजा मामीकडं ! . . ." त्यासरशी मी हारखून टुम्म होत वाऱ्यागत घरात धावले. वाळलेला परकर पोलका नेसले. कुंकू लावलं. काजळ माखलं न् आत्तीनं सांगितलं होतं त्याप्रमाणं देव्हाऱ्यापुढचं फुलांनी शिगोशीग गच्च भरलेलं फुलांचं पातेलं घेऊन हार गुंफायला बसले ! . . .

एव्हाना उन्हं कितीतरी वर आलीवती न् आमच्या भैनाबाई आपल्या बाळाला खेळवीत मला ऐकू येईल अशा थाटात गीत गातेल्या कानावर येत होत्या . . .

आरडी बाई परडी ग
परडी एवढं काय ग
परडी एवढं फूल ग
दारी मूळ कोण ग
दारी मूळ नणंद ग
नणंदेनं काय आणलं ग
नणंदेनं पाटल्या आणल्यान् ग
पाटल्या मी लेत न्हाई
संगं मी येत न्हाई
चारी दरवाजे लावा ग बाई
झिप्रं कुत्रं सोडा ग बाई . . .

म्हणून मी तो फुलांचा पसारा सुई दोऱ्यासकट ती होती तिकडं उचलून घेऊन गेले न् तिला विचारलं, "तूं खरंच जाणार नाहीस तुझी नणंद आल्यावर ?"

"का ? . . . तुला पंचाईत ? . . ." माझ्या बोलण्याला हसून दाताखाली पदर दाबीत आमच्या फुल्लाक्कानं, भैनाईनं, मला गप्प केली खरी, पण मी थोडीच तिचं ऐकणार ? मी तिला विचारलं, "भोंडल्याच्या गीतातलं खरं असतं सगळं ?" "का ? . . . कशाला पाइजे ?" तिनं मलाच उलट प्रश्न केला. "लाल लाल चाबूक घेऊन येणार तुझा नवरा पण ?" "वेडीच आहे हं ! . . ." माझ्या या बोलण्यावर फुल्लाक्का मोठ्यानं हसली न् तिनं आमच्या आईला ऐकू जाईल अशा रीतीनं म्हटलं, "काकू, हिचं लगीन करूया आता लौकर. मग बघू हिचा नवरा कसा येतो ते!"

मग मी तिथून "हं हं ! ठेवलंय !" असं तिलाच वेडावण दाखवीत पळाले न् परकराच्या घोळात फुलं घेऊन आजोळ गाठलं . . .

त्यावेळी दारात मामी उभी होती. तिच्या हातात ती तांदूळ निवडीत होती ते ताट होतं आणि अंगणात माकडांचा खेळ चालला होता ! . . .

त्यामुळं "एवढा हार करून दे तूं ! . . ." मामीच्या लुगड्याच्या पदरात फुलं कोंबून मी माकडांचा खेळ पहायला गेले आणि चांगली तासभर तिथंच रमले. मग . . . माकडानं माकडीवर काठी उचलली न् मुरके मारीत ती त्याला चुकवून पळू लागली की, भोंडल्याच्या गीतातले लाल लाल चाबूक मला आठवू लागले . . . अंगावर सरसरून काटा आला ! . . . कुडबुड कुडबुड वाजवीत त्या माकडांना खेळवितेल्या दोरीगत हा चाबूक घेऊन येतेला नवरा आपल्याला पण खेळवील, या धास्तीनं जीव भेदरून गेला न् तिथल्याच एका ओळखीच्या घरात जाऊन न् त्या घरातल्या

म्हाताऱ्या आजीकडून भोंडल्याच्या गीतात ही सगळी गंमत असते, हे खरं खरं करून घेस्तोवर मामांच्या वाड्याकडं ढूंकूनही पाहिलं नाही ! . . .

खाईल्या पट्टीत वईल्या पट्टीत
पेरला राळा बाई पेरला राळा
कोण्या देशीचा काऊ आला बाई काऊ आला
एक लोंबट खोडुन नेलं बाई खोडुन नेलं
सईच्या अंगणी झोकुन दिलं बाई झोकुन दिलं
सईनं उचलूनी घरात नेलं बाई घरात नेलं
चोळुन मोळूनी राळं केलं बाई राळं केलं
कांडुन कुटूनी तांदुळ केलं बाई तांदुळ केलं
म्होरच्या बाजारी विकाय नेलं बाई विकाय नेलं
त्या बाई तांदळाचा खुरदा आला बाई खुरदा आला
त्या बाई खुरद्याची बांगडी लेली बाई बांगडी लेली
सासूबाईनं ठोसला दिला बाई ठोसला दिला
तो बाई ठोसला दूरच्या दूर बाई दूरच्या दूर
माझं माहेर पंढरपूर बाई पंढरपूर
माझं आजूळ रत्नांगिरी बाई रत्नांगीरी
माझ्या हातात कोइमतुरी चुडा बाई कोइमतुरी चुडा
मला बसायला निळ्ळा घोडा बाई निळ्ळा घोडा
कोण्या देशीचे गहू आणले बाई गहू आणले
त्याच्या चपात्या केल्या नऊ बाई केल्या नऊ

त्या बाई चपातिच्या तारा तुटं बाई तारा तूटं
माझ्या झिम्म्याचा धिंगाणा उठं बाई धिंगाणा ऊठं

हातानं चुटक्या वाजवीत न् कोकूर उडद्या घेऊन नाचत नाचत मी मामांच्या घरी भोंडल्याच्या तिसऱ्या माळेला म्हणायचं गीत तोंडपाठ म्हणत रस्त्यानं आले खरी, पण गीत संपल्याबरोबर माझ्या पाठीत धाप्दिशी रपाटा बसला ! . . . त्यासरशी मी कोलमडून तोंडावर आपटले न् दात घुसलेल्या ओठांमधून रक्त आलं ! . . . म्हणून "आईग ! . . ." करीत कण्हत कुथत उठले तर कमळी ! . . . तिला बघून माझ्या अंगाची लाही झाली . . . झुबल्यानं तोंडाचं रक्त टिपीत मी तिच्यावर ओरडले, "का पाडलंस मला ? . . . आता मामांना सांगते थांब !" आणि धूम पळत सुटले ! . . .

"थांब . . . थांब ! . . ." माझ्या मागोमाग येत कमळीनं मला थोपवायचा प्रयत्न केला. पण मी थांबले नाही म्हणताना तिनं रस्त्यातला एक बारका दगड उचलून माझ्यावर भिरकावला न् तो घाव नेमका बसून मला उजव्या अंगाच्या आखेवर खोक फुटली ! . . . नजरेपुढं अंधेरी येऊन मी पट्किनी खाली बसले ! . . .

तेवढ्यात समोरून आमचे मामा कुठं तरी जात होते त्यांनी मला पाहिलं. त्यांनी आईच्या मायेनं माझ्यावर झेप घेऊन मला उठवीत पोटाशी धरली. माझ्या ठिपकत्या रक्तानं त्यांचा सदरा बरबटला ! . . .

"कुणी मारलं ? . . ." मामांनी मला पोटाशी धरीत विचारलं. तशी मी कमळीला मार बसू नये म्हणून खोटं बोलले, "जोरात पळत होते तर पडले ठेकचळून ! . . ." मामांना ते खरं वाटलं. त्यांनी मला खाकोटीला धरून घरी आणली न् स्वत: परड्यात जाऊन दगडी मोडीचा पाला आणीत त्याच्या रसात जखमा भिजवून बांधल्या फडक्यानं ! . . .

माझ्या बाजूनं भोंडल्याला त्या दिवशी रंग भरलाच नाही. वाटल्या डाळीची खिरापत दुसऱ्या माळेला होती म्हणून कमळीची गृहपाठाची वही मामीनं का कुणी फाडवलीवती तर तिनं माझ्यावरच तो आळ घेऊन आकाशपाताळ एक केलंवतं ! . . . खरं तर माझा काही एक संबंध त्यात आला नव्हता. पण आजीनं का कुणीतरी गमतीनं चहाडी केल्याच्या आरोपावरून हिनं माझ्यावर सपाटून आग पाखडली होती. मला वाटेत पाडून न् मारून जसा सूड उगवला होता ! . . .

पण मी गप्प बसलेवते. मामांना हे कळतं तर त्यांनी ओल्या चिपाडानं कमळीला सोलून काढली असती. मामींनी मग एवढ्या तेवढ्यावरून राईचा पर्वत केला असता न् भोंडला सोळा दिवस चालायचा तो तसाच म्हणजे चवथ्या पाचव्या दिवशीच गप्प झाला असता ! . . . मला हे ठाऊक होतं म्हणून मी सगळं मुकाटयानं सोसलं . . . आजीजवळ तेवढं खरं बोलून मन मोकळं केलं न् आमच्या घरी कुणालाच कशाचा पत्ता लागू दिला नाही. खेळताना पडले या कल्पनेत सारं घर झालं गेलं विसरून गेलं न् मी झाल्या जखमांना आपलीच फुंकर घालीत त्या दिवशी निजले ! . . .

त्यावेळी रात्र किती झालीवती कुणाला माहीत. माझ्या कानावर भोंडल्याचं गाणं आलं म्हणून मी उठून बसले, तर आमच्या माळीच्या वैलीकडल्या साऱ्याखालून आवाज येतेला . . .

ऐलमा पैलमा गणेश देवा
माझा खेळ मांडून दे करीन तुझी सेवा
माझा खेळ मांडिला वेशीच्या दारी
पारवं घुम्मतं बुरजावरी

पारवणी बाळाचे गुंजावणी डोळे
गुंजावणी डोळ्याच्या गुंफील्या टिक्का
आमच्या गावच्या भुलोजी नायका ...

म्हणून मी पण आपला आवाज त्या आवाजात मिसळला आणि त्या गीताला पुढं केलं...

येशील काय देशील काय
कांडा तीळ बाई तांदूळ कांडा
आमच्या आया तुमच्या आया
खातील काय दुधोंडे
दुधोंड्याची लागली टाळी
आयुष्य दे रे बा माळी
माळी गेला शेता भाता
पाऊस पडला येता जाता
पडपड पावसा थेंबोथेंबी
थेंबोथेंबी आळव्या लोंबी
आळव्या लोंबती अंकणा
अंकणा तुझी सात कणसं
भोंडल्या तुझा सोळा वर्षं ...

त्यासरशी आजी उठली न् ती काय बोलायच्या आतच आईनं मला सांगितलं, "कमळीगत कुणाचा साद ग ?" आजीनं पण मग तिच्या

म्हणण्याला होकार भरला न् आडणा लावलेलं माळीचं दार उघडून ती दिंडी दरवाजाला जात म्हणाली, "कोण हाय?" तिच्या पाठोपाठ मीपण गेलेली. तर आजीनं मला आपल्या पाठीशी घेत लपवलेली न् पुन्हा तोच प्रश्न केलेला ! . . .

पहातोय तर कमळी ! . . . अगबाई ! . . . आणि बरोबर गावाहून आलेले कमळीचे गुंडामामा ! ! . . .

"आता? ह्या येळंला येणं केलं पावणं? . . ." आजीनं त्या दोघांना घरात या म्हटलं तशी कमळी मला येऊन बिलगली न् गुंडामामांनी खुलासा केला, "पोरगी निजंनाच काय केल्या. आलो मग." त्यापाठोपाठ कमळीनं पण सांगितलं, "हिला मी पाडली ! . . . मारलं दिकुन ! . . . चुकलं म्हणायला आले ! . . . माझी गृहपाठाची वही मिळाली, फाडलीवती ती जुनी होती. गेल्याच्या गेल्या सालची ! . . ."

माहीत नव्हतं ते भलत्या वेळी आमच्या घरात घुमलं म्हणताना आईनं मला बाजूला नेत "काय झालं ग?" असा प्रश्न केला. तशी माझ्यापेक्षा कमळीनंच झालं गेलं सांगितलं ! . . . घटकाभर चिडीचूप झाली.

तेवढ्यात आमचे बाप्पाजी खाकरत खोकरत बाहेर आले न् गुंडामामांना चहा करा अशी आज्ञा त्यांनी आईला दिली.

झालं गेलं गंगेला मिळालं समजून मग आमच्या गोष्टी चालल्यावत्या इतक्यात मामा हातात कंदील घेऊन आले. म्हणाले कसे, "मंजुळाला लई लागलंतं. कसं हाय आता? चैन पडंना तर आलो येळकाळ विसरून."

त्याउप्पर आमच्या बाप्पाजी दयाळांनी, "चालायचंच पोरांची जात. आता रडलं न् आताच हसलंबी !" एवढाच खुलासा केला. त्यांनी त्या बोलण्याला तिथंच खोडलं न् मग चहाच्या पेल्यात ते वादळ पार विरून गेलं . . .

कमळी मग माझ्याजवळ निजली. शंभरवेळा तिनं माझ्या दुखऱ्या अंगावर फुंकर मारली न् सांगायचं म्हणजे माझा डोळा सुजलावता तो भाग तिनं आपल्या जिभेनं चाटला !...

आमच्या आत्तीनं ते पाहिलं. अंथरूणातून उठून ती चटकन् आमच्या-जवळ आली. बाळरांडाव आत्तीच्या मनाला उमाळा आला. तिनं आमच्या दोघींचे पण मटाटा मुके घेतले न् आम्हाला देव्हाऱ्यापसल्या उतरंडी-जवळच्या कोनपाडात नेऊन आमच्याकडून उद्याच्या भोंडल्याला चढत्या कमानीगत वाटावं असं एक गीतही सांगता सांगताच घोकून घेतलं ...

सोन्याची सुपली बाई मोत्यांनी गुंफली
तिथं आमच्या वन्सं खेळत होत्या
वन्सं वन्सं मला आलं मूळ
गुणाचे गौरी मला काय पुसतीस पुसजा आपल्या दिराला

सोन्याचा चेंडू बाई मोत्यांचा दांडू
तिथं आमचे भाऊजी खेळत होते
भाऊजी भाऊजी, मला आलं मूळ
गुणाचे गौरी मला काय पुसतीस पुसजा आपल्या जावेला

सोन्याची रवी बाई रूप्याचा डेरा
तिथं आमच्या जाऊबाई ताक करीत होत्या
जाऊबाई जाऊबाई मला आलं मूळ
गुणाचे गौरी मला काय पुसतीस पुसजा आपल्या सासऱ्याला

सोन्यांची सहाण बाई रूप्याचं खोड
तिथं आमचे मामाजी पूजा करीत होते
मामाजी मामाजी मला आलं मूळ
गुणाचे गौरी बरीच दिसतीस पुसजा आपल्या सासूला

सोन्याचा करंड बाई रूप्याचा आरसा
तिथं आमच्या सासूबाई कुंकू लावीत होत्या
सासूबाई सासूबाई मला आलं मूळ
गुणाचे गौरी बरीच दिसतीस पुसजा आपल्या पतीला

रूप्याचा पलंग बाई रेशमाची गादी
तिथं आमचे पती निजले होते
पतीदेवा पतीदेवा मला आलं मूळ
आणा फणी, घाला वेणी, जाऊंद्या राणी माहेरा...

त्यावेळी तिच्या सासरच्या जाचाकाचानं वाळून कोळ झालेली आत्ती आम्हाला तिच्या मनासारखं गाणं म्हणायला आलं, ध्यानात धरणं जमलं, या गोष्टीवरून खूष होऊन आमचे गालगुच्चे घेत उठली. म्हणताना "पोरी एक खुळचा न् तुमी पण ?" आईनं आत्तीला अशी डिवचली न् ती धारेला गेली. दोघीपण खदखदून हसल्या. आपल्या आपल्या कामाला लागल्या. कारण एव्हाना पार उजाडलं होतं न् दाराशी "दान पावलं वासुदेवाला !" असं म्हणून नाचतेला वासुदेव बासरी घुमवीत उभा होता ! ...

आजोळच्या जिव्हाळचानं आणि कवतिकानं माखलेला भोंडला दिसामासी रंगत चालल्यावर जिवाला अशी हुशारी आली की, काय सांगावं ?

आमच्यासारख्या लाडक लेकी आम्हीच अशा थाटानं आम्ही जगू लागलो. आणि त्या काराणानं आमचा गळा पण असा काय सुरेल होत जिथं तिथं फिरला की . . .

अक्कणमाती चिक्कणमाती ओटा तो मळावा
अस्सा ओटा सरस बाई जातं ते रोवावं
अस्सं जातं सरस बाई गहू ते दळावे
अस्से गहू सरस बाई सोजी ती काढावी
अश्शी सोजी सरस बाई करंज्या कराव्या
अश्शा करंज्या सरस बाई दुरडी भराव्या
अश्शा दुरड्या सरस बाई शेल्यानं झाकाव्या
अस्सा शेला सरस बाई पालखी ठेवावा
अश्शी पालखी सरस बाई माहेरी धाडावी
अस्सं माहेर सरस बाई खेळाया धाडीतं
अस्सं सासर द्वाड बाई कोंडूनी मारीतं

ह्या गाण्यानं कवतिकाचं भलं दांडगं ओझं घेऊन मिरवताना मान वाकली ! . . . गळ्या शप्पथ ! . . .

घोळचा मेळचानं एकमेकींच्या घरी फिरत जाताना कमळीनं माझा हात सोडला नाही न् मीही तिच्या सावलीला विसरले नाही. चढत्या श्रेणीनं रोज एकेका संख्येनं वाढणारी गाणी आम्ही मोठ्या दिमाखानं सांगत गेलो . . . अधून मधून मी तर पाटावर रांगोळीनं हत्ती देखील काढला वळणदार असा आणि आमच्या आळीतल्या प्रत्येक घरी गेल्यावर त्या दिवसाचं नवं गीत म्हणून . . .

हस्त हा दुनीयाचा राजा
तयासी नमस्कार माझा
नमस्कारासरशी वारा
आधी पडल्या मेघधारा
मागून पडल्या मुसळधारा
धारा या दुधाच्या दिसती
त्यानी ग पिकं ती पोसती
हस्ताची मग पाळी आली
म्हणौनी त्यानं गंमत केली
त्याच्या योगे झाला चिखल
त्या बाई चिखलात लावल्या केळी
एकेक केळ बाई मोठालं
हादग्या देवा वाहिलं
हादगा मी गांधारी पूजीते
सखयांना बोलावीते
हादगा देव मी पूजीते

ह्या आत्तीनं शिकवलेल्या गीताचा दणका उडवून दिला. शहाणपणाचा शिक्का आमच्यावर बसल्यानं जोर आला, तर हादग्या देवासाठी फुलांचा पण भडीमार करून आम्ही आमचं अंगण दाबून सजवलं. पोरींना देखील शेवंतीच्या फुलांचे गजरे दिले तर ! गावभर त्यामुळं आमच्या भोंडल्याचा बोभाटा झाला. आमचं आजोळघर हारखून टुम्म झालं ! . . . शाळेतल्या

भोंडल्यात सुद्धा आमचं नाव निघालं न् ज्यांच्या त्यांच्या नजरा आमच्यावरच खिळल्या ! . . . "गाणं म्हणा, गाणं म्हणा" म्हणून आमच्या दोघींच्यावर जिकडून तिकडून मारा झाला . . . आम्हीपण मग शाळेत सगळ्यांच्यावर चढ करायला धजलो बाई ! . . . खरंच ! . . . मावशीकडून ऐकून ध्यानात धरलेलं गीत मी सांगितलं न् पोरींना संगं घेऊन कमळीनं पाठीमागून सूर ओढला . . .

वाजे चौघडा रुणझूण
आला ग हादगा पावणा
दारी तुळस दऊणा
जाईजुई शेवंती दुपारी
फुले ग नानापरी
हार गुंफीते कुसरी
वहाते मी हादग्यापरी
हादगा देव मी पूजीते
लवंगा सुपाऱ्या वेलदोडे
करून ठेवले वीडे
आणखिन् दुधातले दुधपेढे
वहाते मी हादग्यापुढे
हादगा देव मी पूजीते
सख्यांना बोलावीते
हादगा देव मी पूजीते ....

आणि आमच्या शाळेतल्या बाईंनी शाळेची पेटी मुद्दाम आणवून घेत आमच्या म्हणण्याबरहुकूम वाजवली . . . त्या कारणानं गाणं मस्त रंगत गेलं न् भोंडल्याला आगळी शोभा आली. शाळेजवळच्या वाटेनं येणाजाणारांनी देखील हा आवाज ऐकून पटांगणात डोकावून पाहिलं न् शेजारच्या मुलींनी आवर्जून तिथं येत खिरापतीसाठी हात पुढे केले ! . . .

सनई चौघडा वाजवून हादगा देव आल्याची वार्ता देणाऱ्या या गीता-तील दवण्याच्या दरवळीचं सांगितलेलं माहात्म्य त्यावेळी मनावर एवढं ठसलं की, पंचमीच्या गीतात म्हटल्याप्रमाणं "जिथं पाय ठेवू तिथं हा दवणा उगवून येईल" या ईर्षेला आम्ही जवळ केली. तेवढं सामर्थ्य कमवूच कमवू म्हटलं न् साधी गूळ खोबऱ्याची खिरापत होती तरी बाईंच्याकडून ती मिळाल्याकारणानं पाचीपक्वान्नांच्यापेक्षाही अधिक चवीनं खाऊन टाकली . . .

त्यावेळी आपल्या सोंडेत हार धरलेले दोन हत्ती एकमेकांसमोर उभे होते त्या हादग्याच्या भिंतीवर टांगलेल्या चित्राकडं मी कितीतरी वेळ बघत उभी राहिले आणि दारी गरजतेल्या पावसाच्या मुसळधारीची वाट बघितली. हत्तीच्या सोंडेची झारी करून धरणीवर कोसळतेल्या मेघधारांच्या वर्षावात भिजून चिंब होत मामांच्या घरी जायची लहर आलीवती ! . . . पण पाऊस लौकर येत नव्हता आणि विजेच्या गडगडाटानं दाही दिशा दणाणून तो येणार असल्याची साक्ष देत अंधेरल्या होत्या . . . तर कमळी न् मी तशाच पुढं झालो. पाटीदप्तर डोईवर घेऊन, पायांला वाऱ्याचे पंख जोडून आणि घरच्या भोंडल्याला सांगायचं वेगळं गाणं ओठांवर खेळवून . . .

**हातूका मतूका**
**चरणी चतूका**

चरणीच्या सोंडेवरी
बाळ खुळखुळ गोंडेवरी
एकेक गोंडा विसाविसाचा
नागरसाडचा नेसायचा
नेसा ग नेसा मावल्यांनो
सात घरच्या पावण्यांनो
पावण्या गेल्या खोली
चितांग टाकलं डोली
चिटक्या मिटक्या करंडफूल
ते बाई फूल मी तोडीलं
हादग्या देवा वाहीलं
हादग्या तुझा तुरारा
मोतीयाचा भुरारा
भैनी तुमचा चांद वो
मोतीयाचा भांग वो
चांदासरशी निळ्ळी घोडी
येता जाता कमळं तोडी ...

पण वाटेत पावसानं गाठलंच. हा मोठ्ठा दांडगा पाऊस आला. वाजत गाजत. त्यामुळं कुणाच्या तरी घराच्या वळचणीखाली आसऱ्याला उभं राहाणं भाग पडलं! ... बराच वेळ तसंच ताटकळत असं! त्या घरची माणसं आत या म्हणाली तरी पन्हाळी खाली धबधब्याचं पाणी झेलल्या-गत येतेली मजा चाखीत! ...

होता होता पाऊस उघडला आणि आम्ही आमच्या घरला कशाबशा गेलो ... भिजल्या अंगानं ! ... ओलीचिंब झालेली दप्तरं घेऊन !

आजीनं मग आमचे केस पुसले. वाळलेले कपडे नेसायला दिले. गरम गरम दूध दिलं.

तेवढ्यात भोंडला खेळायला पोरी आल्या. भोंडला खेळून, खिरापत घेऊन निघून गेल्या. त्यांच्याबरोबर कमळी गेली. मला थंडी वाजत होती तर मी तशीच घरी बसले. डाळींबाची खिरापत लगेच ओळखली गेली म्हणून माझा जरा हिरमोड झाला होता ! ...

"म्हातारे आई, चिटक्या मिटक्या म्हणजे काय ग ?" चुलीपुढं भाकरी करीत बसलेल्या आजीला मी गाण्याचा दाखला देऊन प्रश्न केला. आजी हसली. चुलीला लावलेली टम्म फुगतेली भाकरी फिरवून ठेवीत म्हणाली कशी,

"चिटक्या मिटक्या मजी बारीक नक्षी. तासाची. अक्षी चमकतेली. का ?"

"आणि करंडफूल कशाला म्हणायचं ?"

"त्या नक्षीच्या फुलाला. दागिना असतो."

"आणिक पैल्या बायका मेण्यात बसून यायच्या होय हादगा पुजायला ?"

"हं ! ... नवस फेडायचा असतो तर यायच्या. ह्या गावास्नं त्या गावाला जाताना."

"भारी भारी साडी नेसून ?"

"हो. पावण्या माणसांच्या घरी जाताना चांगलं लुगडं नको अंगाव ?"

"आमाला पण घेऊन जा पावण्यांच्या घरी."

"कशाला ?"

" नवं नेसायला मिळेल !"

" येडी का ग तू मंजुळे ?" आजी माझ्या बोलण्याला हसली न् तिनं मला काटवटीत भाकरीचं पीठ मळून घेऊन हातावरची भाकरी कर म्हटलं.

इतक्यात भोंडला खेळून कमळी आली न् घाईघाईनं म्हणाली कशी, " चंपीकडं खिरापत होती जिलबीची आज ! त्यांच्याकडं आलेल्या पावण्या पोरीनं झक्कास गाणं सांगितलं ! . . ."

भाकरीचं पीठ मळता मळता मी मान वर केली. डोळ्यांनी होतेल्या खुणांवर कोण पावणी मुलगी याबद्दलची विचारपूस झाली. तशी कमळी बोलली, " अग, सरस्वती. चंपीच्या मामांची लेक. भर्जरी परकर पोलका होता. नाकात नाजूक नथणी होती. कपाळावर कर्दळी कुंकू. हातात सोन्याचे गजरे. पायात छुमछुमतं पैजण. वेणीला जरीगोंडा. गळ्यात टपोरी बोर-माळ. कानात हालते डुलते झुब्बे. हसते तर अशी गोड की पाहातच राहावं ! . . . तिच्या गालाला खळी पडते अग हसताना ! आवाज पण छान आहे. तू यायला हवं होतंस."

" उद्या येईन." कमळीच्या बोलण्यानं भारावून जात आपण भोंडल्याला न जाण्यात चूक केल्याची रुखरुख मी तिला बोलून दाखवली. पण चैनच पडेना. त्या पोरीपेक्षा आपण चढ गाणी म्हटलीच पाहिजेत या ईर्षेनं मला घेरलं ! . . . म्हणून आजीनं केलेली ऊन ऊन भाकरी दुधात कुसकुरून खात न् लोणच्याची फोड तोंडी लावीत मी कमळीला म्हटलं, " उद्या आपल्या घरी येणार आहे का ती ?" तशी तिनं मान डोलावीत " हो " म्हटलं. तिला मुद्दाम बोलावल्याचं देखील तिनं सांगितलं. त्यासरशी मी आजीला म्हणाले, " आमचं गीत बरोबर आहे का बघ. काल परवाच ध्यानात धरलंय. साळव्यांच्या छबीनं शिकवलं."

तर आजी " म्हणा " म्हणाली. म्हणून मग मी कमळीला चिमटीत खाता खाताच सूर काढला . . .

एक लिंबू झेलू बाई दोन लिंबू झेलू
तीन लिंबू झेलू बाई चार लिंबू झेलू
चार लिंबू झेलू बाई पाच लिंबू झेलू
पाचा लिंबांचा पानोळा
माळ घाली हनुमंता
हनुमंताची निळ्ळी घोडी
येता जाता कमळं तोडी
कमळाच्या पाठीमागं लपली राणी
अग अग राणी इथं कुठं पाणी
पाणी नव्हे यमुना जमुना . . .

"थांब थांब ! . . ." कमळीनं आपला खरकटा हात माझ्या तोंडावर दाबीत म्हटलं, "हेच हेच गाणं तिनं सांगितलं . . ."

"अय्या ! खरंच ?" कमळीचा हात बाजूला ढकलीत मी तिला आणखी विचारलं, " शेवटपर्यंत तिला आलं म्हणायला एका दमात ?"

" हो तर ! . . . पण छबीनं सांगितल्यापेक्षा शेवट निराळा होता."

" अगबाई ! . . . तुझ्या लक्षात आहे छबीनं सांगितलेलं ?"

" हं ! . . . आईला पण येतं की हे गाणं !"

" मामीला ?"

"हो. मी घेतलंवतं तिच्याकडून शिकून."

"बोलली नाहीस मग मला ?"

"अग आज सकाळीच तर ताक करताना सांगितलं आईनं गाणं ! . . ."

"मग तिच्या गाण्याचा शेवट निराळा म्हणजे कसा ?"

"सांगते. छबी हे गाणं पुढं नेती तेव्हा . . .

यमुना जमुनाची बारीक वाळू
तेथे खेळे चिलार बाळू
चिलार बाळाला भूक लागली
सोन्याच्या शिंपीनं दूध पाजलं
पाटावरच्या घडीवर निजवलं
नीज रे नीज रे चिलारबाळा
मी तर जाते सोनारवाड्या
सोनारदादा सोनारदादा मी आले
गौरीचे मोती झाले का नाही

इथंवर आली की थांबते. घटकाभरानं त्या गाण्याचा शेवट होतो तेव्हा ती म्हणते की . . .

गौरीच्या घरी तांब्याच्या चुली

बरोबर आहे ?"

"हो. मग ?"

"इथूनच त्या मुलीच्या गाण्याचा शेवट वेगळा असतो."

"तो कसा ग ?"

"ऐक तू. छबीनं सांगितलं की . . .

**गौरीच्या घरी तांब्याच्या चुली**
**भोजन झाले आवळी खाली**
**उष्ट्या पत्रावळी चिंचेखाली**
**शेणगोळा आंब्याखाली**
**पान सुपारी उद्या दुपारी"**

"आणि ही काय म्हणते निराळं ?"

"म्हणते की . . .

**गौराईच्या माहेरी तांब्याच्या चुली**
**मांडव घातला मखमखपुरी**
**लगीन लागलं सूर्यातळी**
**उष्ट्या पत्रावळी चिंचेखाली . . ."**

"पुढचं मग आपण शिकलोय तसंच ?"

"अंहं ! ऐक ऐक . . .

**टाळ्या पोळ्या पुरणाच्या पोळ्या**
**भुलाई जाते सासऱ्या**

जाईल तशी जाऊंद्या
खीर पोळी खाऊंद्या
भोंडला खेळायला येऊंद्या ..."

"अच्छा ! खानदेशातली आहे वाटतं मग ?"

"माहीत नाही. का ?"

"त्यांच्याकडं भोंडला नसतो. भुलाबाई असते."

"भुलाबाई ? ... म्हणजे ?"

"पारबती." माझ्या ऐवजी कमळीला आमच्या आजीनं उत्तर केलं आणि आम्हाला "उठा" म्हणाली.

जेवून झालं होतं तर आम्ही उठलो. हात धुतले. खरकटं आवरलं. देवाला नमस्कार केला. समईच्या वातीला तेल घातलं. ...

तेवढ्यात मामा बाहेरून आले. मामीपण शेतावरून आली आणि मग घटकाभरानं मामांच्या मागं लागून मी आमच्या घरी गेले...

पण वाटेनं येताना भुलाबाई न् ती पावणी मुलगी यांच्याएकीच्या विचारानं पुरतं घेरून टाकलं ! ... भाद्रपद पौर्णिमेपासून तो आश्विनी पौर्णिमेपर्यंत तब्बल महिनाभर भुलाबाई खेळणाऱ्या पोरींना चिक्कार गाणी येत असतील न् त्यांच्यापुढं आपण फिक्क्या पडू याची खंत लागली. म्हणून मी निजताना आईला जरा रागानंच विचारलं, "कमळीला मामी भोंडल्याची गाणी शिकवते. तुला काय झालं मला शिकवायला ?"

त्यावर आई खूप हसली न् नेहमीच्या सवयीप्रमाणे तिनं मला एवढंच ऐकवलं, "गप नीज गुमान ! उगीचच लई लागतं हिला नको ते ! ..."

त्यामुळं झालेला हिरमोड पोटाशी धरून उसासत मी मुकाट्यानं या अंगावरून त्या अंगावर होत लोळण फुगडी घातली ! . . . आज्जी न् आत्ती कीर्तनाला गेल्यावत्या मारूतीच्या देवळात. नाहीतर रात्रभर त्यांना जागवून मी एक सोडून छप्पन गाणी शिकत कमळीच्या नाकावर टिच्चून दुसऱ्या दिवसाचा भोंडला गाजवला असता ! . . . पण ते सुख आमच्या नशिबात उगवायला नको ? . . .

**येथुन दाणा पेरीत जाऊ माळियाच्या दारी**
**हळूच भुलाबाई पाय टाका**
**साखळ्या तुमच्या भारी**
**येथून दाणा पेरीत जाऊ माळियाच्या दारी**
**हळूच भुलाबाई पाय टाका**
**तोरड्या तुमच्या भारी**
**येथुन दाणा पेरीत जाऊ माळियाच्या दारी**
**हळूच भुलाबाई पाय टाका**
**तोडे तुमचे भारी ....**

त्या पावण्या मुलीच्या बरोबरीनं म्हणा नाहीतर तिच्या गाण्यास गाणं म्हणून म्हणा छबीनं भुलाबाईची अशी गाणी भोंडल्याच्या वेळी सांगितल्या-वर मला खूप बरं वाटलं. त्या दिवशी अकरावी माळ होती तरी एकापेक्षा एक वरचढ गाण्यांचा भडीमार उडाला. म्हणून त्या पोरीला मी हळूच एका अंगाला घेऊन विचारलं, “तुझं गाव ग ?”

“कोल्हापूर. का ?” तिनं उत्तर केलं.

“तुझं नाव ?”

"राधिका. का ?"

"कमळीची तुझी ओळख ?"

"परवा झाली. का ?"

"भुलाबाईची गाणी तुला कशी येतात ?"

"माझ्या मावस बहिणीनं शिकवली. का ?"

"ती कुठं असते ?"

"धुळ्याल्या. का ?"

"भुलाबाई खानदेशात असते नाही ?"

"हो. का ?"

"सारखी काय का का करतेस ?" राधिकेचा मला जरा राग आला म्हणून मी चिडले, तशी ती रागवायची सोडून नुसतीच हसली न् हत्तीची रांगोळी काढलेल्या पाटाभोवती पोरींनी फेर धरलावता तर त्यात जाऊन मिसळली ! . . . आणि सांगितलं की, लगेच तिनं भुलाबाईचं दुसरं गाणं पण ! . . . . . .

**या या भुलाबाई आमुच्या आळी**
**तुमच्या अंगात निळ्ळी निळ्ळी चोळी**
**निळ्या निळ्या चोळीवर काढीला मोर**
**त्या बाई मोरावर सांडिला गुलाल**
**भुलोजी दल्लाल घरी नाही, घरी नाही . . .**

ठेका तर असा धरला न् गळा तर असा काढला की, त्या गाण्यातील निळी निळी चोळी, तिच्यावर बसलेला मोर, त्याच्यावर सांडलेलं अत्तर, पारव्या

चोळीवरच्या मोरावर सांडलेलं पाणी आणि भुलोजी घरी नाही हे पालुपद जिवाला चटका लावून गेलं ! . . .

मला पण मग जोर आला. आमच्या आत्तीनं रात्रभर घोकून घेतलेलं भोंडल्याचं गाणं मग मीही पोरींना सांगितलं . . .

आला चेंडू, गेला चेंडू
राया चेंडू झुगारिला
आपण चाले हत्ती घोडे
राम चाले पायी
राम गऽऽ वेचितो कळ्या
सीता गऽऽ गुंफीते माळा
आल्या आल्या लगीन वेळा
आगाशी घातीला मंडप
जरतारी घातीलं बोहलं
जरम्‌जरती बसले पती
पती न्‌ पती तिरूबाई राळा
तिरूबाई राळा मुंज्या बाळा ...

पण गंमत अशी की, राधिकेलाही हे गाणं येत असल्यानं माझ्या बरोबरीनं ती पण सांगत सुटली ! . . .

मुंज्या बाळाची मुंजक दोरी
तीच दोरी सावध मारी

सावधा सावधा सर्वत्काळ
सर्वत्काळाचा आणला दोर
आणा दोर बांधा चोर
बांधा चोर बाई झाडाशी ...

आणि तिला हे गाणं का आलं म्हणून रागावलेली मी मधेच गप झाले, तर तिनं बहाद्दरणीनं केला की शेवट सुद्धा !...

झाड झपकं फूल टपकं
ते बाई फूल मी तोडीलं
बहिणा माथा खोवीलं
बहिणा तुझी वेणी ग
सोनीयाची फणी ग
बहिणा तुझा खोपा ग
उंदीर घेतो झोपा ग

गाणं संपलं तशी पोरी खूप हसल्या न् भोंडला संपला. शिताफळाची खिरापत बराच वेळ ओळखता आली नाही, तरी शेवटी राधिकेनंच ओळखली ती न् पोरी खिरापत घेऊन निघून गेल्या ... आमच्या घरचा भोंडला सर्वात शेवटी होता ... त्यावेळी रात्रीचे आठ वाजल्याचे ठोके ढेलजेतल्या घड्याळात पडलेवते ! ...

पण छबी, मी न् कमळी बराच वेळा गप्पा हाणीत जेवलो. आज मामांच्याकडेच राहायचं होतं म्हणून अंगणातल्या ओटचावर खूप वेळ बोलत बसलो ... तर त्यावेळी छबीनं आम्हा दोघींना बुरजावरचे पारवे घुमतात

त्या रीतीनं प्रत्येक ओळीनंतर "हूं ... हूं ..." करा म्हटलं न् स्वत: बडबडत सुटली ...

सासरच्या वाटे कुचकुच काटे
कोण पावणा आला ग बाई ... हूं ... हूं ...
सासरा पावणा आला ग बाई ... हूं ... हूं ...
सासऱ्यानं काय आणलं ग बाई ... हूं ... हूं ...
सासऱ्यानं पाटल्या आणल्या ग बाई ... हूं ... हूं ...
पाटल्या मी लेत न्हाई
संगं मी येत न्हाई
चारी दरवाजे लावा ग बाई ... हूं ... हूं ...
झिपरं कुत्रं सोडा ग बाई ... हूं ... हूं ...

बाई बाई बाई ! हे गाणं घरातले झाडून सगळे नातलग एकेक दागिना घेऊन आल्यावरही असंच रंगत गेल्यावर आमची हसून हसून मुरकुंडी वळली ... आणि अखेर शेवटी दुसरे दिवशी जेव्हा या गाण्यानं ...

पती पाहुणे आले ग बाई ... हूं ... हूं ...
पतीनी काय आणलं ग बाई ... हूं ... हूं ...
पतीनी चाबुक आणला ग बाई ... हूं ... हूं ...
चाबुक मी लेते, संगं मी येते
चारी दरवाजे उघडा ग बाई ... हूं ... हूं ...
झिपरं कुत्रं सावरा ग बाई ... हूं ... हूं ...

ही वार्ता दिली तेव्हा तर कमालच झाली हसण्याची !... भोंडल्याचा फेर तिथंच सोडून पोरी पोटभर हसत सुटल्या, "असलं काही नको बाई" ची खात्री देत घेत !... एक गाणं कमी पडत होतं तरी देखील छबीच्या घरची खिरापत पुढं आली. त्यासरशी कुणीतरी किंचाळलं, "खिरापत कशातली आहे ग ?... कोणत्या अक्षरातली ?..." आणि "ये ऽ ऽ असं नाही विचारायचं !..." असा चहूबाजूंनी मारा देखील झाला. पण म्हणून ऐकतो कोण ? घटकाभर गप्प बसून आमची कमळीच बोलली, "खाण्यातली आहे का फळातली ?... फराळातली आहे का मेव्यातली ?..."

"छे छे ! यापैकी कशातलीच नाही." छबीनं ठासून उत्तर करीत परकराच्या सोग्यात खिरापतीचं भांडं आणखीनच लपवलं ! ...

"बटाटयाची भाजी ?"

"अं हं !"

"रव्याचे लाडू ?"

"अं हं !"

"घोसाळयाची भज्जी ?"

"छट् ! वास नसता का आला ?"

"चुरमुरे फुटाणे ?"

"फार लांब गेलीस."

"बरं साबुदाण्याची खिचडी ?"

"छे ग ! आनखीन् लांब गेलीस तूं."

" पुरणाची पोळी ?"

" वेडीच आहे !..." छबीनं कमळीच्या गालावर टिचकी मारली न् मग हशाचा असा गदारोळ उडाला की, विचारू नये !... कारण कोथिंबिरीच्या वड्या घातलेलं खिरापतीचं भांडं त्या धांदलीत छबीच्या हातातून निसटून भुईवर आदळलं न् खिरापत आपोआप फुटत चव्हाट्यावर आली !...

" अशानं आम्ही नाही जा!..." चिडलेली छबी एकदम फुरंगटून बसली न् मग तिच्या आईनं सर्वांना खिरापत वाटीत घरोघरी जा म्हटलं !...

कमळी न् मी त्या कारणानं लगोलग घरी आलो. पण मनाला कसं खटकलंच !... छबीचा हिरमोड व्हायला नको होता असं मनापासून वाटलं. म्हणून मामांच्या घरापर्यंत आलेल्या आम्ही मांजराच्या पावलानं गुपचूप अशा छबीकडं पुन्हा आलो ! ...

बघतोय तर छबी रडून रडून लाल भडक झालेली न् तिच्या आईनं तिला कुशीत घेऊन तिची समजूत घालीत उद्याच्या भोंडल्याला बाराखडीतली खिरापत करीन म्हणून विनवण्या चालवलेल्या !...

आम्हांला बघून छबी आईच्या कुशीतून उठली. तोंड धुऊन आली. उगीचच हसल्यागत केलं आणि झाल्या गोष्टीचा वचपा काढायचा तर उद्या पहिल्यांदा आपल्याच घरी भोंडला खेळायचा अशी आम्हांला गळ घालून मोकळी झाली !... आम्ही पण तिला " बरं " म्हटलं. तशी ती खुलली. तिचा चेहरा उजळला. तिच्या आईनं मग आम्हांला सालपापडच्या न् भातवड्या भाजून दिल्या. भुईमुगाच्या शेंगा दिल्या. आम्ही मग चवीनं हे खात बसलो...

बोलता बोलतां कमळी म्हणाली, " सरत्या भोंडल्याला आमच्या घरी मज्जा येईल."

"कशाची ?" भुईमुगाच्या शेंगा फोडीत न् त्यातले दाणे भाजक्या भात-वडीशी खाताना खमंगपणा आलेल्या तोंडात जीभ फिरवीत छबीनं तिला विचारलं न् मी पण तिच्याकडे रोखून पाहिलं.

"आमच्या बाप्पाजींनी सगळ्या पोरींना द्यायला भाजक्या उतरंडी आणल्यात ! . . ."

"खरं म्हण की ?"

"शप्पथ ! . . . का ? . . . खोटं वाटतं ?" छबीचं न् कमळीचं हे बोलणं ऐकून माझा जीव सुखावला. त्या उतरंडी आणायला मी मामांना बोललेवते. चांगल्या मोजून एकवीस ! . . . आई नवस बोललीवती मी मधे आजारी असताना ! . . . म्हणून मला आनंद झाला. भातुकली खेळायला गंमत येईल या विचारानं माझापण चेहरा उजळला. म्हणून मी त्या दोघींना सांगितलं, "खिरापत आमच्या घरची."

"अरे वा !" कमळीनं आश्चर्य व्यक्त केलं. मलाही मग जोर आला, "का ? . . . आम्हाला हौस नाही ? माझी आई नाबर आहे ?"

"कोण म्हणतं ?. . . पण मग तुझ्या घरी भोंडला का नाही ?" कमळीनं मला रोखीत विचारलं. तशी तिची माझी ही जुंपली! . . . शब्दानं शब्द वाढत गेला. उणं दुणं निघालं ! . . . त्यामुळं छबीच्या आईनं आमचं भांडण सोडवीत समजूत घातली, "लहान मुलांनी हामरी तुमरीवर येऊ नाही . . . लोकाच्या आहात का तुम्ही ?. . . एका रक्तामासाच्या की ग ! . . . मग ?. . . खेळा जावा पळा !" त्यासरशी कमळी दणाण् पळून गेली न् मी हत्तीच्या चालीनं आमच्या घरी आले ! . . .

पण खरं सांगायचं तर त्या दिवशी चैन पडली नाही. आमच्या घरी भोंडला लाभत नाही या सबबीवर मामांच्या दारात जायची वेळ आली म्हणूनच

जीव खाऊन घ्यायला लागला !... घरच्या माणसांना मी ढिगानं बोलून घेतलं. कमळीच्या बोलण्यातल्या कागाळच्या आईजवळ केल्या.

पण माझ्याकडं कुणी लक्षच दिलं नाही. कारण तेवढ्यात मामी कसलीशी दुरडी घेऊन आली आणि आईशी तिचं कुचुकुचु बोलणं निघालं ! . . . आमची आत्ती न् आजीपण तिच्याजवळ येत बोलत बसल्या... आमच्या घरी भोंडला बोळवायचा ठरून कमळीची हौस म्हणून भोंडला मामांच्या घरी खेळून झाल्यावर जिलेबीचं जेवण ठरलं ! . . . सगळ्या पोरींची केळीच्या पानावर पंगत ठरली !... बसायला न् ताटाला पाट ! ताटाभोवती रांगोळी ! उद्‌बत्त्यांचा घमघमाट !! . . . गॅसच्या बत्तीचा उजेड !!!...

कमळीचा रुवाब माझ्यापेक्षा जास्त होतोय हे लक्षात आलं तशी माझं डोकं उठलं न् "काय नको ! काय नको"... अशी नकार घंटा वाजवीत रडक्या तोंडानं मी साऱ्या घरभर फिरले ! ...

आमच्या आत्तीनं मग माझी कड घेतली. कमळीपेक्षा चढ राजवर्खी चुडा घालायचं वचन दिलं. अंगावर सरी बिंदल्या घालीन म्हटली. राकडीकेवड्यानं भांग भरायला कबूल झाली न् घरी येतेल्या पोरींच्यापेक्षा मी उठून दिसावी अशी माझी काजळटिकली पण करीन म्हणाली.

तिनं मग रात्रभर जागून आमचा सोपा उभंकडवी सारवून काढला. दुसऱ्या दिवशी अंगणात सडा घालून कणा रांगोळी काढली. लहानग्या सदूनं मग घरभर वाजा वाजवून फिरत धमाल उडवून दिली न् आमचं सारं घर हसरं होऊन गेलं ! ... चांदण्यागत लख्ख लख्ख झालं ! ...

त्यामुळं राजीखुशीनं मी सोळाव्या माळेची फुलमाळ मामांच्या घरच्या हादग्या देवाला वाहिली आणि मोठ्या ऐटीनं पोरींना गाणं सांगितलं ...

नणंदा भावजया दोघीजणी
घरात नव्हतं तिसरं कोणी
खेळत बसल्या ग अंगणी
भावजईवरी डाव आला
रुसून बसली गाईच्या गोठ्यात
सासुरवाशी सून रुसून बसली कैशी
यादव राया राणी रुसून बसली कैशी
नणंद गेली समजावयासी
उठा उठा वैनी चला घरासी
सोन्याची सुपली देते तुम्हासी
सोन्याची सुपली नक्को मला
मी नाही यायची तुमच्या घरासी
सासुरवाशी सून रुसून बसली कैशी
यादवराया राणी रुसून बसली कैशी ...

आणि मग घरचा दीर चेंडूदांडू घेऊन येस्तोवर, जाऊ ताकाचा डेरा देईन म्हणस्तोवर, सासरा पैशाची पेटी देईन असं सांगस्तोवर, सासू अर्धा संसार द्यायला निघस्तोवर ह्या सुनेची मर्जी राखीत हे गाणं त्याच दिमाखानं लांबवलं. अखेरशेवटी ...

नवरा गेला समजावयासी
उठ उठ राणी चल घरासी
लाल लाल चाबूक देतो तूशी

उठली ग उठली गजबजून
पदर घेतला सावरून
सासुरवाशी सून घरासी आली कैशी
यादवराया राणी घरासी आली कैशी ...

हा डामडौल पुढं आला न् टाळ्यांच्या गजरात हे गाणं संपलं ! पण कमळी मोठी द्वाड ! ... माझ्या थोरल्या भावाशी तिचं लगीनं ठरलेलं असून देखील तिनं मला चिडवावी म्हणून हेच गाणं वेगळ्या रीतीनं वरच्या आवाजात सांगीत पोरींना म्हणा म्हणाली ...

नणंदा भावजया दोघीजणी
घरात नव्हतं तिसरं कोणी
शिंक्यावरचं लोणी खाल्लं कोणी
मी नाही खाल्लं वहिनीनं खाल्लं
आता माझा दादा येईल ग
दादाच्या मांडीवर बसीन ग
वैनीच्या चाड्या सांगीन ग
दादा तुझी बायको चोरटी
असूं दे माझी चोरटी
घे काठी लाग पाठी
घरादाराची लक्ष्मी मोठी

पोरींनी ह्या गाण्याला पण टाळ्या दिल्या ... आम्ही दोघींनी मारक्या म्हशीगत एकमेकींकडं पाहिलं तशी त्या राधिका पावणीनं गोड गोड हसत

फेराचा हात धरला न् आमच्यापेक्षाही देखण्या आवाजात भोंडल्याच्या गीतांची अखेरी साधली . . .

आमच्या परसात भेंडीचं झाड
लवलव डहाळ्या हालतील ग
अंबरमामा येतील ग
फुल फुल साड्या आणतील ग
फुल फुल साड्या बाई नेसू ग
लांब लांब पदर काढू ग
लांब लांब पदर जरतारी
आमचे मामा व्यापारी
तोंडात चिकणी सुपारी
सुपारी गेली फुटून
मामा आले उठून

आणि मग सगळ्या मुलींनी एकसारखा फेर धरून तो चांगल्या रीतीनं घुमवीत न् सारं अंगण डोक्यावर घेत एका आवाजात एका तालात भोंडला उजवला . . .

गंगू, रंगू, तंगू ग
मिळूनी हादगा गाऊ ग
केळी, नारळी, बकुळ, पोफळी
वरती लिंबू लावू ग
मिळूनी हादगा खेळू ग

अननस, पपनस, कणीस, आंबा
वरती डाळिंब लावू ग
मिळूनी हादगा खेळू ग
खिरापती या किती तऱ्हेच्या
करंज्या लाडू मोदक ग
मिळूनी हादगा गाऊ ग
आडबाई आडवणी
आडाचं पाणी खारवणी
आडात पडला शिंपला
आमचा भोंडला संपला

त्यासरशी वाजत गाजत येतेल्या पावसानं असं झोडपून काढलं की, आम्हाला आमच्या घरी पळता पळता भुई थोडी झाली !...



संग्राहक –

१. सौ. लीलावती पवार, कराड
२. सौ. कुमुदिनी पवार, चितळी
३. प्रा. सुमन पाटील, कराड
४. श्री. के. व्ही. खामकर, मुंबई
५. सौ. कुमुद गोसावी, औरंगाबाद
६. कु. राजश्री मोहिते, सांगली
७. श्रीमती जानकीबाई पाटील, बागणी
८. श्रीमती कमल लिधडे, वाटेगाव
९. सौ. कस्तुरबा चिवटे, सावळज
१०. सौ. प्रतिभा जाधव, पुणे
११. सौ. गीता भोसले, कोल्हापूर
१२. सौ. विमलाबाई प्रभाकर देवस्थळी, मुंबई
१३. सौ. शरदिनी मोहिते, सांगली
१४. डॉ. सरोजिनी बाबर, पुणे
१५. सौ. शकुंतला पवार, चितळी
१६. कु. विद्या देसाई, बागणी
१७. सौ. नलिनीबाई शिंदे, पुणे
१८. सौ. मंगला नावडीकर, पुणे

१ संग्राहिका
*सौ. लीलावती पवार*

१

माझा रहाट ग माझा रहाट ग
माझ्या रहाटाचा ग हिंदू
माझे चौघेजण बंधू
माझ्या घरा का ग यीना
माझी खबर का ग घीना
माझा रहाट ग

माझ्या रहाटाचा ग कना
माझ्या चौघीजणी सुना
माझ्या घरा का ग यीना
माझी खबर का ग घीना
माझा रहाट ग

माझ्या रहाटाचा ग तातू
माझे चौघेजन नातू
माझ्या घरा का ग यीना
माझी खबर का ग घीना
माझा रहाट ग

माझ्या रहाटाचं ग चाक
माझं चौघेजन ल्याक
माझ्या घरा का ग यीना
माझी खबर का ग घीना
माझा रहाट ग

माझ्या रहाटाची ग कुनी
माझ्या चौघीजनी भैनी
माझ्या घरा का ग यीना
माझी खबर का ग घीना
माझा रहाट ग

२

पाळ ठोकीलं वाळवंटी ग वाळवंटी
घेतली आपुली झोळी काठी ग झोळी काठी
गेला सीतेच्या वाड्यायाला ग वाड्यायाला
सीतामाई धर्म करी ग धर्म करी

नाही मी माघारी धर्म करी ग धर्म करी
सासू मालन नाही घरी ग नाही घरी
गेली पाचीया उतरंडी
घेतलं चवऱ्या रंगी सूप
काडलं मोती या न पवळं
वतलं जोशाच्या पदरात
धाकल्या दिरानं देखीयलं
तांब्या भरूनी द्यावं पाणी
वैनीच्या हातचं नको पाणी
वैनी जोशाची झाली रानी
नको आणूसा मनी पाप
जोशी आपुला माय-बाप

३

रहाटावर रहाट पडला ग सई पडला ग
पैंजण माझं मोडलं ग सई मोडलं ग
हळूच बोला ग बायानू
ऐकल गलीचा राजा ग सई राजा ग
गलबा हुईल माझा ग सई माझा ग

(साखळ्या, हार, पुतळ्या, बाळ्या, बुगड्या, काप, गोट, पाटल्या इ. प्रत्येक दागिन्याचे नाव घालून हे गाणे असेच पुढे म्हणावे.)

४

आकडी घालू जकडी पैंजान पकडी
सोबन साडा गौराई धाडा
माळ्याच्या ग मळ्या
जाईच्या ग कळ्या
इसाची ग चंची
तिसाचा ग कात एलदोडे सात
एवढा तरी बंदू पान का ग खातो
रस्त्यावैनं जातो
रस्त्याची ग नार बोलं भीरं भीरं

५

आधी नमूया श्रीगणराया
मंगलमूर्ती विघ्न हराया
मंगलमूर्ती उंदरावरी
सत्ता त्याची इंद्रावरी
इंद्र हा स्वर्गीचा राजा
झुलती हत्तीच्या फौजा
वरुण चाकर इंद्राचा
पाऊस पाडी हस्ताचा

पडपड पावसा थेंबो थेंबी
थेंबो थेंबी आल्या लोंबी
पिवळ्या लोंबी आणूया
तांदूळ त्यांचे कांडूया
मोदक लाडू बनवूया
गणरायाला अर्पूया

६

कृष्ण घालितो लोळण यशोदा आलीया धावून
काय पाहिजे बाळा तुजला देते मी आणून
आई मला साप दे धरून
त्याचा चाबूक दे करून
असलं रे कसलं बाळा तुझं जगाच्या वेगळं
कृष्ण घालितो लोळण
यशोदा आलीया धावून

काय पाहिजे बाळा तुजला देते मी आणून
आई मला इच्चू दे धरून
त्याची आंगठी दे करून
असलं रे कसलं बाळा तुझं जगाच्या वेगळं
कृष्ण घालितो लोळण
यशोदा आलीया धावून

काय पाहिजे बाळा तुजला देते मी आणून
आई मला आभाळ दे धरून
त्याची गादी दे करून
असलं रे कसलं बाळा तुझं जगाच्या वेगळं
कृष्ण घालितो लोळण
यशोदा आलीया धावून

काय पाहिजे तुजला देते मी आणून
आई मला चांदण्या दे धरून
त्याच्या लाह्या दे करून
असलं रे कसलं बाळा तुझं जगाच्या वेगळं
कृष्ण घालितो लोळण
यशोदा आलीया धावून

७

एक लिंबू झेलू बाई दोन लिंबू झेलू
दोन लिंबू झेलू बाई तीन लिंबू झेलू
तीन लिंबू झेलू बाई चार लिंबू झेलू
चार लिंबू झेलू बाई पाच लिंबू झेलू
पाचा लिंबाचा पाणवठा
माळ घाली हणमंता

हणमंताची निळ्ळी घोडी
येता जाता कमळं तोडी
कमळा पाठीमागं लागली राणी
अग अग राणी इथं कुठं पाणी
पाणी नव्हे यमुना जमुना
यमुना जमुनाची बारीक वाळू
तेथे खेळे चिल्लाळ बाळू
चिल्लाळ बाळाला भूक लागली
सोन्याच्या शिपीनं दूध पाजीलं
परटाच्या घडीनं तोंड पुसीलं
इथं इथं निज रे बाळा
मी तर जाते सोनार वाड्या
सोनारीन बाई सोनार दादा
बाळाच्या बिंदल्या झाल्या का नाय
आज नाय झाल्या उद्या या

(हे गाणे सगळे दागिने याच रीतीने गोवून होस्तोवर लांबते.)

८

हत्तीच्या सोंडेवरी खेळीला बाळ
तुटली साखळी पडली माळ

तुझ्या ग मावशीनं तुला काय दिलं
माझ्या ग मावशीनं मला दिलं वाळं
असलं कसलं वाळं बाई पाय झालं काळं
तुझ्या ग मावशीनं तुला काय दिलं
माझ्या ग मावशीनं मला दिल्या साखळ्या
असल्या कसल्या साखळ्या बाई फुलाच्या पाकळ्या
तुझ्या ग मावशीनं तुला काय दिलं
माझ्या ग मावशीनं मला दिल्या पाटल्या
असल्या कसल्या पाटल्या बाई हाताला दाटल्या

९

हादगा हा सोन्याचा आरसा
निघाली फुलाई राजसा
फुलाईला घालीवीत कोण कोण जाई
आमचा शंकर ऐकत नाई
शंकरानं तोडली मोगऱ्याची कळी
कळी तोडून आश्वीन झाला
आश्वीन होऊन नगरात गेला
नगरात जाऊन आणली काडी
काडी मोडून बांधली माडी

माडी मोडून बांधलं तळं
त्या बाई तळ्यात कोण कोण धुतं
त्या बाई तळ्यात परटीण धुती
विठूबाच्या शेल्याला निळा रंग देती
विठूबाची टोपी रंगा रंगाची
रूकमाईची चोळी भिंगाची

१०

पड पड पावसा थेंबो थेंबी
थेंबो थेंबी आल्या लोंबी
आल्या लोंबी आणूया
तांदूळ त्याचे कांडूया
मोदक लाडू बनवूया
हादग्या देवाला वाहूया

११

डेरक डेरा मांडोनी मैदानी
त्या बाई डेऱ्यात कायसं घुम्मतं
काढा रवी पाहू द्या आम्हास
घुसळण घुसळीती राधीका गवळण

तिचा ग पदर लोंबतो मैदानी
कृष्णाजी कृष्णाजी दान द्या
निळ्या घोडीवर बसू द्या
निळी घोडी वाकली
सखुबाई सुंदर हासली
सखुबाई तुमच्या अंगणी
सुंदर चाफा लावोनी
ऐसा चाफा फुलला
चला बाई कळ्या तोडायला
आम्ही बाई कळ्या तोडील्या
आम्ही बाई हार गुंफिला
आम्ही बाई हार गुंफिला
हादग्या देवा वाहिला

१२

शिडी लावूनी शिंक्यावरी
दही दुधाची करता चोरी ग
तुम्ही गोकुळच्या नारी

एक म्हणता एक
माझ्या हरीला म्हणता कुणाचा तूं लेक
तुम्ही गोकुळच्या नारी

दोन म्हणता दोन
माझ्या हरीला म्हणता तूं कोण
तुम्ही गोकुळच्या नारी

तीन म्हणता तीन
माझ्या हरीला म्हणता तूं लहान
तुम्ही गोकुळच्या नारी

चार म्हणता चार
माझ्या हरीला म्हणता का रं
तुम्ही गोकुळच्या नारी

पाच म्हणता पाच
माझ्या हरीला म्हणता लोणी खाच
तुम्ही गोकुळच्या नारी

सहा म्हणता सहा
माझ्या हरीला म्हणता चोर हा
तुम्ही गोकुळच्या नारी

सात म्हणता सात
माझ्या हरीला म्हणता खारे भात
तुम्ही गोकुळच्या नारी

आठ म्हणता आठ
माझ्या हरीला म्हणता खाष्ट ग
तुम्ही गोकुळच्या नारी

नऊ म्हणता नऊ
माझ्या हरीला म्हणता भारीच मऊ
तुम्ही गोकुळच्या नारी

दहा म्हणता दहा
माझ्या हरीला म्हणता आमच्यात रहा
तुम्ही गोकुळच्या नारी

१३

नंदा भावजया दोघीजणी
खेळत होत्या गाईच्या गोठ्यात
खेळता खेळता झगडा झाला
भावजयीवर डाव आला
रूसून बसली गाईच्या गोठ्यात
सासूरवासी सून रूसून बसली कैसी
यादवराया राणी रूसून बसली कैसी

सासू गेली समजावयाला
चल चल मुली आपुल्या घराला
निम्मा संसार देते तुजला
निम्मा संसार नक्को मजला
मी नाही यायची तुमच्या घराला
सासूरवासी सून रूसून बसली कैसी
यादवराया राणी रूसून बसली कैसी

सासरा गेला समजावयाला
चल चल मुली आपुल्या घराला
लाल लाल साडी देतो तुजला
लाल लाल साडी नक्को मजला
मी नाही यायची तुमच्या घराला
सासूरवासी सून रूसून बसली कैसी
यादवराया राणी रूसून बसली कैसी

दीर गेला समजावयाला
चला चला वैनी आपुल्या घराला
चेंडू लगोरी मी देतो तुम्हाला
चेंडू लगोरी नक्को मजला
नाही यायची तुमच्या घराला
सासूरवासी सून रूसून बसली कैसी
यादवराया राणी रूसून बसली कैसी

जाऊ गेली समजावयाला
चला चला बाई आपुल्या घराला
ताकाचा डेरा देते तुम्हाला
ताकाचा डेरा नक्को मजला
मी नाही यायची तुमच्या घराला
सासूरवासी सून रुसून बसली कैसी
यादवराया राणी रुसून बसली कैसी

नणंद गेली समजावयाला
चला चला वैनी आपुल्या घराला
सोन्याची सुपली देते तुम्हाला
सोन्याची सुपली नक्को मजला
मी नाही यायची तुमच्या घराला
सासूरवासी सून रुसून बसली कैसी
यादवराया राणी रुसून बसली कैसी

पती गेला समजावयाला
चल चल राणी आपुल्या घराला
लाल लाल चाबूक देतो तुजला
लाल लाल चाबूक नक्को मजला
मी येते तुमच्या घराला
सासूरवासी सून घरासी आली कैसी
यादवराया राणी घरासी आली कैसी

२ संग्राहिका
सौ. कुमुदिनी पवार

१

हस्त हा दिनीयाचा राजा
तयासी नमस्कार माझा
नमस्कारासरशी वारा
आधी पडल्या मेघधारा
मागून पडल्या मुसळधारा

(चाल वेगळी)

धारा या दुधाच्या दिसती
त्याने ग पिके ही पोसती

(चाल वेगळी)

हस्ताची मग पाळी आली
म्हणूनी त्याने गंमत केली
त्याच्या योगे चिखल झाला
त्या बाई चिखलात लावली केळ
एकेक केळं मोठालं
हादग्या देवा वाहिलं
खिरापतीला वाटीलं

(चाल वेगळी)

हादगा गांधारी मी पूजीते
सख्यांना बोलावीते
हादगा देव मी पूजीते
एक लिंबू झेलू बाई
दोन लिंबू झेलू
बारा लिंबाची सेवा करू
हनुमंताला माळ घालू
हनुमंताची निळी घोडी
येता जाता कमळं तोडी
कमळात गुंतली एकच राणी
अग अग राणी
इथं कुठं पाणी
वरच्या डोंगरीचं आणा पाणी
आमच्या गावचा नवलक माळी
त्यांनी लावली करवंदजाळी
करवंदजाळीचं पाट्र्ळं
पाट्र्ळं सोगा जी लोळू द्या
आडवा गोपा जी खेळूं द्या
आमचा भोंडला घुमूं द्या

२

हरीच्या नैवेद्याला केली
जिलबी बिघडली
त्यातली एवढीशी उरली मळी
त्याची केली बुंदीकळी
तुपात तळली साखरेत घोळली
जिलबी बिघडली
त्यातला एवढासा उरला पाक
त्याचा केला साखरभात
तुपात तळली साखरेत घोळली
जिलबी बिघडली
त्यातलं एवढंसं उरलं पीठ
त्याचं केलं थालीपीठ
तुपात तळली साखरेत घोळली
जिलबी बिघडली

३

आला चेंडू गेला चेंडू राया चेंडू झुगारिला
आपण चाले हत्ती घोडे राम चाले पायी
राम ग वेचीतो कळ्या
सीता ग गुंफिते माळा

आल्या ग लगीनवेळा
आकाशी घातीला मंडप
जरतारी घातीलं बोहलं
जरम् जरती बसले पती
पती न् पती तिरूबाई राळा
तिरूबाई राळा मुंजा बाळा
मुंजा बाळाची मुंजक दोरी
तीच दोरी सावध मारी
सावधा सावधा सर्वतकाळ
सर्वतकाळाचा दोर
आणा दोर बांधा चोर
बांधा चोर बाई झाडाशी
झाड झपकं, फूल टपकं
ते बाई फूल मी तोडीलं
बहिणा माया खोवीलं
बहिणा तुझी वेणी ग
सोनीयाची फणी ग
बहिणा तुझा खोपा ग
उंदीर घेतो झोपा ग
कोथिंबीरी बाई ग
आता कधी येशील ग

आता येईन चैत्रमासी
चैत्रा चैत्रा लौकर ये
हस्त घालिन हस्तारा
देव बसविन देव्हारा
देव्हाराच्या चौकटी
उठता बसता लाथाबुक्की
घे काठी लाग पाठी
घेत नाही काठी
लागत नाही पाठी
घरादाराची लक्ष्मी मोठी

४

अक्कण माती चिक्कण माती ओटा तो मळावा
अस्सा ओटा सुरेख बाई जातं ते रोवावं
अस्सं जातं सुरेख बाई शोजी ती काढावी
अश्शी शोजी सुरेख बाई करंज्या कराव्या
अश्शा करंज्या सुरेख बाई दुरडी भराव्या
अश्शी दुरडी सुरेख बाई शेल्यानी झाकावी
अस्सा शेला सुरेख बाई पालखी ठेवावा
अश्शी पालखी सुरेख बाई माहेरी धाडावी
अस्सं माहेर सुरेख बाई खेळाया धाडीतं
अस्सं सासर द्वाड बाई कोंडूनी मारीतं

५

ऐलमा पैलमा गणेश देवा
माझा खेळ मांडून दे करीन तुझी सेवा
माझा खेळ मांडीला वेशीच्या दारी
पारवं घुमतं बुरजावरी
पारवणी बाळाचे गुंजावणी डोळे
गुंजावणी डोळ्यांच्या सारवील्या टिक्का
आमच्या गावच्या भुलोजी नायका
एवीन गाय तेवीन गाय
कांडा तीळ बाई तांदुळ कांडा
आमच्या आया तुमच्या आया
खातील काय दुधोंडे
दुधोंड्याची लागली टाळी
आयुष्य देरे बा माळी
माळी गेला शेता भाता
पाऊस पडला येता जाता
पड पड पावसा थेंबोथेंबी
थेंबोथेंबी आळव्या लोंबी
आळव्या लोंबती अंकणा
अंकणा तुझी सात कणसं
भोंडल्या तुझी सोळा वर्षं

६

बाईच्या परसात भेंडीचं झाड
भेंडीचं झाड बाई खारवलं
मामाचं घर बाई थोरवलं
मामाच्या घरी येऊन जा
तूप रोटी खाऊन जा
घाल ग मामे तुपाची धार
तुपाची धार गेली वाऱ्यानं
बापाजी आले घोड्यावनं
आई आली चुड्यावनं
भाऊजी आले काळ्या कुत्र्यावनं
का वो भाऊजी रुसला
काळा विंचू डसला
काळा विंचू पापी
रांजणाच्या काठी
रांजण गेला गडगडी
पाऊस आला धडधडी

७

एक लिंबू झेलू बाई दोन लिंबू झेलू
तीन लिंबू झेलू बाई चार लिंबू झेलू

चार लिंबू झेलू बाई पाच लिंबू झेलू
पाचा लिंबाचा पानोळा
माळ घाली हनुमंता
हनुमंताची निळ्ळी घोडी
येता जाता कमळं तोडी
कमळाच्या पाठीमागं लपली राणी
अग अग राणी इथं कुठं पाणी
पाणी नव्हे यमुना जमुना
यमुना जमुनाची बारीक वाळू
तिथं खेळे चिलार बाळू
चिलार बाळाला भूक लागली
सोन्याच्या शिंपीनं दूध पाजलं
पाटावरच्या घडीवर निजीवलं
नीज रे नीज रे चिलार बाळा
मी तर जाते सोनारवाड्या
सोनारदादा सोनारदादा
गौरीचे मोती झाले का नाही
गौरीच्या घरी तांब्याच्या चुली
भोजन झालं आवळी खाली
उष्ट्या पत्रावळ्या चिंचेखाली
शेण गोळा आंब्याखाली
पान सुपारी उद्या दुपारी

८

गौराईच्या माहेरी तांब्याच्या चुली
मांडव घातला मखमख पुरी
लगीन लागलं सूर्यातळी
उष्ट्या पत्रावळी चिंचेखाली
टाळ्या पोळ्या पुरणाच्या पोळ्या
भुलाई जाते सासरी
जाईल तशी जाऊंद्या
खीर पोळी खाऊंद्या
आमचा भोंडला वर्षाला येऊंद्या

९

हातुका मतूका चरणी चतुका
चरणीच्या सोंडेवरी
बाळा खुळखुळ गोंडेवरी
एक एक गोंडा विसाचा
नागर साड्या नेसायचा
नेसा ग नेसा भावल्यांनो
सात घरच्या पावण्यांनो
पावण्या गेल्या खोली
सीतानं टाकली डोली

चिटक्या मिटक्या करंड फूल
ते बाई फूल तोडीलं
हादग्या देवा वाहिलं

१०

बाजारातून आणला एकच आंबा
त्याचं केलं सुंदर लोणचं
ते बाई लोणचं मामंजीना वाढलं
मामंजीनी मला शाबासकी दिली
त्याचं मला हासू आलं
ते बाई हासू तांब्यात भरलं
तो बाई तांब्या गंगेला वाहिला
गंगेनं मला पाणी दिलं
ते बाई पाणी मोराला दिलं
मोरानी मला पिसे दिली
ती बाई पिसे बुरडाला दिली
बुरडानं मला बुट्टी दिली
ती बाई बुट्टी माळ्याला दिली
माळ्यानं मला फुलं दिली
ती बाई फुलं मी हादग्याला वाहिली

११

सोन्याची सुपली मोत्यांनी गुफली
तिथं आमच्या वन्सं खेळत होत्या
वन्सं वन्सं मला आलं मूळ
गुणाचे गौरी मला काय पुसतीस
पुस जा आपल्या दिराला

सोन्याचा चेंडू बाई मोत्याचा दांडू
तिथं आमचे भाऊजी खेळत होते
भाऊजी भाऊजी मला आलं मूळ
गुणाचे गौरी मला काय पुसतीस
पुस जा आपल्या जावेला

सोन्याची रवी बाई रुप्याचा डेरा
तिथ आमच्या जाऊबाई ताक करीत होत्या
जाऊबाई जाऊबाई माल आलं मूळ
गुणाचे गौरी मला काय पुसतीस
पुस जा आपल्या सासऱ्याला

सोन्याची सहाण बाई रुप्याचं खोड
तिथं आमचे मामंजी पूजा करीत होते
मामंजी मामंजी मला आलं मूळ
गुणाचे गौरी बरीच दिसतीस
पुस जा आपल्या सासूला

सोन्याचा करंड बाई रुप्याचा आरसा
तिथं आमच्या सासूबाई कुंकू लावित होत्या
सासूबाई सासूबाई मला आलं मूळ
गुणाचे गौरी बरीच दिसतीस
पुस जा आपल्या नवऱ्याला

रुप्याचा पलंग बाई रेशमाची गादी
तिथं आमचे पति बाई निजले होते
पतिराज पतिराज मला आलं मूळ
आणा फणी घाला वेणी
जाऊंद्या राणी माहेरा

१२

एवढंसं घरकुल बाई सारवूनी काढावं
उखळ त्यावरी रोवावं बाई जातं जी मांडावं
अस्सं उखळ गोड बाई खपल्या कांडाव्या
अश्शा खपल्या गोड बाई गहू ते वलवावे
अस्सं गहू गोड बाई जातं ते टाकावं
अस्सं जातं गोड बाई शोजी ती काढावी
अश्शी शोजी गोड बाई गव्हले वळावे
अश्शे गव्हले गोड बाई दुरडी भरावे
अश्शी दुरडी गोड बाई माहेरी धाडावी

अस्सं माहेर गोड बाई खेळाया धाडीतं
अस्सा खेळ गोड बाई आजोळी नेईतं
अस्सं आजोळ गोड बाई खायाला देईतं
अस्सं सासर द्वाड बाई कोंडूनी मारीतं

## ३

संग्राहिका
प्रा. सुमन पाटील

१

अवळीन चढो की चवळीन चढो
माझ्यानं चवळी चढेना
दादानं चवळी चढवली
माझी ओटी भरवली
माझ्या ओटीत खारका
पाण्याला जाते द्वारका

२

आड बाई आडोनी
आडाचं पाणी खारोनी
आडात होती दिवळी
दिवळीत होती सुपारी
आमचा हादगा दुपारी

आड बाई आडोनी
आडाचं पाणी खारोनी
आडात होता शिंपला
आमचा हादगा संपला

३

आक्कण माती चिक्कण माती खळगा जो खणावा
अस्सा खळगा सुरेख बाई जातं ते रोवावं
अस्सं जातं सुरेख बाई गहू ते वलवावे
अस्से गहू सुरेख बाई रवा पिठी काढावी
अशी रवा पिठी सुरेख बाई करंज्या कराव्या
अशा करंज्या सुरेख बाई तबकी भराव्या
अस्सं तबक सुरेख बाई शेल्यानी झाकावं
अस्सा शेला सुरेख बाई पालखीत ठेवावा
अशी पालखी सुरेख बाई माहेरी धाडावी
अस्सं माहेर सुरेख बाई खेळाया मिळतं
अस्सं आजोळ सुरेख बाई खायाला मिळतं
अस्सं सासर द्वाड बाई कोंडूनी मारितं

४

एवढसं तांदूळ बाई नखानी कोरीलं
नखानी कोरीलं वेशीबाहेर नेलं

गाय आली हुंगून गेली
म्हैस आली खाऊन गेली
गाईशी झाला ग पाडा
म्हशीला झाला ग रेडा
तोच रेडापाडा आमच्या बाप्पाजीचा वाडा
बाप्पाजींनी दिली मला जांभळी घोडी
जांभळ्या घोड्याची नेटकी चाल
हादग्या देवा पाऊस पाड

५

पारवळ घुमतंय बुरूजावरी
पारवाळ फकिराचे गुंजवाणी डोळे
गुंजवाणी डोळ्याच्या सारवीन टिक्का
आमच्या गावच्या भुलोजी नायका
एवीन गाय तेवीन काय
कांदा तिळुबाई तांदुळ घ्या
आमच्या आया तुमच्या आया
खातील काय दुधोंडे
दुधोंड्याशी लागली टाळी
आयुष्य देरे बा माळी
माळी गेला शेताभाता

पाऊस पडला येताजाता
पड पड पावसा थेंबोथेंबी
थेंबोथेंबी आल्या लोंबी
आल्या लोंबी कांडूया
मोदक त्याचे बनवूया
हादग्या देवा अर्पूया

४ संग्राहक
श्री. के. व्ही. खामकर

नदीच्या पल्याड कोण पावना आला ग सई आला ग
दीर पावना आला ग सई आला ग
काय काय घिवून आला ग सई आला ग
एकसर घेवून आला ग सई आला ग
एकसर मी लेवायची न्हाय
त्येच्या संगं जायाची न्हाय
चारी दरवाजं झाका ग सई झाका ग
झिप्री कुत्री सोडा ग सई सोडा ग

नदीच्या पल्याड कोण पावना आला ग सई आला ग
सासरा पावना आला ग सई आला ग

काय काय घिवून आला ग सई आला ग
टिक्का घिवून आला ग सई आला ग
टिक्का बिक्का लेवायची न्हाय
त्येंच्या संगं जायाची न्हाय
चारी दरवाजे झाका ग सई झाका ग
लांडी कुत्री सोडा ग सई सोडा ग

नदीच्या पल्याड कोण पावना आला ग सई आला ग
कारबारी पावना आला ग सई आला ग
काय घिवून आला ग सई आला ग
दुरडी घिवून आला ग सई आला ग
दुरडी मी काय खायाची न्हाय
त्येला रिकामं पाटवायची न्हाय
च्यारी दरवाजे उघडा ग सई उघडा ग
झिप्री कुत्री बांधा ग सई बांधा ग

संग्राहिका
सौ. कुमुद गोसावी

५

सखुबाई तुमच्या अंगणी
सुंदर चाफा लावोनी

कसा बाई चाफा फुलला
चला बाई कळ्या तोडायला
आम्ही बाई कळ्या तोडील्या
आम्ही बाई हार गुंफीले
हारा हारा प्रेमाळी
तिकडून आले वनमाळी
सोडा सोडा काचोळी
रात्र झाली गोकुळी
वेणी ग माझी मोकळी
सोनीयाची साखळी
साखळी दिली वाण्याला
वाण्या वाण्या हळकुंड दे
हळकुंड दिलं गौरीला
गौरी गौरी तबक दे
तबक दिलं नदीला
नदी नदी पाणी दे
पाणी दिलं झाडाला
झाडा झाडा फुलं दे
फुलं दिली देवाला
देवा देवा अंगारा दे
अंगारा दिला आईला

आई आई परकर चोळी दे
परकर चोळी दिली बहिणीला
बहिणी बहिणी भातकुन दे
भातकुन दिलं भावाला
भावा भावा गोंडे दे
ते गोंडे लेऊ सासरी जाऊ
सासरीच्या वाटे हळदी कुंकू दाटे
माहेरीच्या वाटे खारीक खोबरं दाटे
पंढरीच्या वाटे नारळ फुटे

६ संग्राहिका
कु. राजश्री मोहिते

१

बाजारातून आणला एकच आंबा
त्याचं केलं सुंदर लोणचं
ते मी लोणचं मामाजींना वाढलं
मामाजींनी मला शाबासकी दिली
ती मी शाबासकी तांब्यात ठेवली
तो मी तांब्या गंगेला वाहिला

गंगेनी मला पाणी दिलं
ते मी पाणी झाडाला घातलं
झाडानी मला फुले दिली
ती मी फुले हादग्याला घातली
हादग्यानी मला प्रसाद दिला
तो मी प्रसाद खाऊन टाकला

२

नंदा भावजया दोघीजणी
घरात नव्हते तिसरे कोणी
शिंक्यावरचं लोणी खाल्लं कोणी
मी नाही खाल्ल वहिनींनं खाल्लं
आता माझा दादा येईल ग
दादाच्या मांडीवर बसेन ग
दादा तुझी बायको चोरटी
घे काठी लाग पाठी
घरा दाराची लक्ष्मी मोठी

३

आज कोण वार बाई आज कोण वार
आज आहे सोमवार
महादेवाला नमस्कार

आज कोण वार बाई आज कोण वार
आज आहे मंगळवार
मंगळागौरीला नमस्कार

आज कोण वार बाई आज कोण वार
आज आहे बुधवार
बृहस्पतीला नमस्कार

आज कोण वार बाई आज कोण वार
आज आहे गुरूवार
दत्तात्रयाला नमस्कार

आज कोण वार बाई आज कोण वार
आज आहे शुक्रवार
आंबाबाईला नमस्कार

आज कोण वार बाई आज कोण वार
आज आहे शनीवार
मारूतीला नमस्कार

आज कोण वार बाई आज कोण वार
आज आहे रवीवार
सूर्याला नमस्कार

४

श्रीकांता कमलाकांता अस्सं कस्सं झालं
अस्सं कस्सं वेडं माझ्या कपाळी आलं

वेडियाच्या बायकोनं केल्या होत्या शेवया
आळ्या आळ्या म्हणून त्यानं टाकून दिल्या
श्रीकांता कमलाकांता अस्सं कस्सं झालं
अस्सं कस्सं वेडं माझ्या कपाळी आलं

वेडियाच्या बायकोनं केले होते लाडू
चेंडू चेंडू म्हणून त्यानं खेळाया घेतले
श्रीकांता कमलाकांता अस्सं कस्सं झालं
अस्सं कस्सं वेडं माझ्या कपाळी आलं

वेडियाच्या बायकोनं केल्या होत्या करंज्या
नाव नाव म्हणून त्यानं पाण्यात सोडल्या
श्रीकांता कमलाकांता अस्सं कस्सं झालं
अस्सं कस्सं वेडं माझ्या कपाळी आलं

वेडियाच्या बायकोनं केल्या होत्या चकल्या
बांगड्या बांगड्या म्हणून त्यानं हातात घातल्या
श्रीकांता कमलाकांता अस्सं कस्सं झालं
अस्सं कस्सं वेडं माझ्या कपाळी आलं

वेडियाची बायको झोपली होती पलंगावर
मेली मेली म्हणून त्यानं जाळून टाकली सरणावर
श्रीकांता कमलाकांता अस्सं कस्सं झालं
अस्सं कस्सं वेडं माझ्या कपाळी आलं

५

आड बाई आडोणी
आडाचं पाणी खारोणी
आडात होता माळी
आमचा हातगा संध्याकाळी

आड बाई आडोणी
आडाचं पाणी खारोणी
आडात पडली सुपारी
आमचा हातगा दुपारी

आड बाई आडोणी
आडाचं पाणी खारोणी
आडात पडली कात्री
आमचा हादगा रात्री

आड बाई आडोणी
आडाचं पाणी खारोणी
आडात पडला शिंपला
आमचा हातगा संपला

६

कमळे कमळे दिवा लाव
दिवा गेला वाऱ्यानं
कमळीला नेलं चोरानं
चोराच्या हातून सुटली
बागेत जाऊन लपली
सासूबाईनी पाहिली
मामंजीनी ठोकली

७

आला चेंडू गेला चेंडू
राया चेंडू झुगारीला
आपण चाले हत्ती घोडे
राम चाले पायी
एवढा डोंगर शोधीला
रामाचा पत्ता कुठं नाही लागला

रामा ग वेचितो कळ्या
सीता ग गुंफीते जाळ्या
आले ग लगीन वेळा
आकाशी घातिला मंडप
जरतारी घातिलं बोहलं
नवरा नवरी बसली पाटी
पाटी पाटी तिरूबाई राळा
तिरूबाई राळा मुंजक बाळा
मुंजक बाळाची मुंज दोरी
तीच दोरी सावध करी
सावध सावध सर्वतकाळ
सर्वतकाळाचा उत्तम दोर
दोर बांधा झाडासी
झाड झबका फूल टपका
ते बाई फूल तोडावं
बहिणीमाथा खोवावं
बहिणी तुझा भांग ग
मोतीयाचा चांद ग
बहिणी तुझी वेणी ग
मोतीयाची फणी ग
बहिणी तुझे केस ग

मोतीयाचे घोस ग
बहिणी तुझा खोपा ग
चंद्रफूल घेतं झोपा ग

८

अवठ बाई कवठ ग
कवठातून आला कागद ग
तो बाई पडला गंगेत ग
अचकुल मचकुल भाऊ ग
वडील माझी जाऊ ग
ती बाई वड्या कशा कापिती
अचक मचक कशी वाढिती
वाढताना बाई देखीली
सासूबाईनी ठोकली

९

तुम्ही बोला बाई तुम्ही बोला
आजची खिरापत कसली ?

चिरमुरे, डाळे, खोबरे
आलेपाक, पोहे, कोरडे

ही नव्हे बाई ही नव्हे
बोला मग खिरापत कसली ?

आटवड्या, पाटवड्या, पोळ्या
बिस्किट, चाकोलेट, गोळ्या
ही नव्हे बाई ही नव्हे
बोला मग खिरापत कसली ?

हरलीस का ग तूं बाई
मुगाची उसळ केली सई
अगोबाई अगोबाई हो का ?
हादग्याचा प्रसाद देतेस का ?

१०

एवढंसं घरकुलबाई सारवुनी काढावं
एवढंसं उखळ बाई त्यावरी रोवावं
एवढंसं जातं बाई त्यावरी मांडावं
अस्सं उखळ गोड बाई खपल्या कांडाव्या
अश्शा खपल्या गोड बाई गहू ते ओलवावे
अस्से गहू गोड बाई जात्यात टाकावे
अस्सं जातं गोड बाई शोजी ती काढावी
अश्शी शोजी गोड बाई गव्हले ते वळावे

अस्से गव्हले गोड बाई दुरडी भरावे
अश्शी दुरडी गोड बाई माहेरी धाडावी
अस्सं माहेर गोड बाई खेळाया धाडीतं
अस्सा खेळ गोड बाई आजोळी नेईतो
अस्सं आजोळ गोड बाई खायाला मिळतं
अस्सं सासर द्वाड बाई कोंडूनी मारीतं

११

एवढासा तांदूळ बाई नखानी खुडीला
भाराजी बांधीला बाई वेशी बाहेर टाकीला
गाय आली हुंगून गेली
म्हैस आली खाऊन गेली
म्हशीला झाला ग रेडा
गाईला झाला ग पाडा
तोच रेडा पाडा बाप्पाजींचा वाडा
बाप्पाजींनी घेतली जांभळी घोडी
जांभळ्या घोडीची नेटकी चाल
जिथं पाऊल पडेल तिथं कोलापुरी शाल
कोलापुरी शाल बाई उंदरून दीशी
ठसा पडेल चोळी चोळी कैशी
ठस्सा मस्सा अंबर घस्सा

अंबरात पडली काडी
तीच काडी बाई उप्पर माडी
उप्पर माडीवर कमळाचं तळं
त्या बाई तळ्यात परटीण धुणं धुती
विठोबाच्या टोपीला निळा रंग देती
विठोबाची टोपी बाई रंगाची
रखुमाईची चोळी बाई भिंगाची

१२

काळी चंद्रकळा नेसू मी कशी
गळ्यात हार बाई वाकू कशी
पायात पैंजण चालू मी कशी
बाहेर मामाजी बोलू कशी
दमडीचं तेल मी आणू कशी
दमडीचं तेल बाई आणलं
सासूबाईचं न्हाणं झालं
वन्सबाईची वेणी झाली
मामांजीची दाढी झाली
उरलेलं तेल झाकून ठेवलं
लांडोरीचा पाय लागला

वेशी पातूर ओघळ गेला
त्यातून हत्ती वाहून गेला

१३

तळ्यात काय झुगझुगतं ग सई झुगझुगतं
तळ्यात झुगझुगतं राळं ग सई राळं ग
कराडकरांची स्वारी निघाली
सगळं कसं काळं ग सई काळं ग
तळ्यात काय झुगझुगतं ग सई झुगझुगतं
तळ्यात झुगझुगती कुदळी ग सई कुदळी ग
कराडकरांची स्वारी निघाली
सगळीच कशी उदळी ग सई उदळी ग
तळ्यात काय झुगझुगतं ग सई झुगझुगतं
तळ्यात झुगझुगतो चंदनाचा पाट ग सई चंदनाचा पाट ग
कराडकरांची स्वारी निघाली
नगाऱ्यावानी प्वाट ग सई नगाऱ्यावानी प्वाट ग
तळ्यात काय झुगझुगतं ग सई झुगझुगतं
तळ्यात झुगझुगती आरती ग सई आरती ग
कराडकरांची स्वारी निघाली
सगळ्या कृष्णमूर्ती ग सई कृष्णमूर्ती ग

७ संग्राहिका
*श्रीमती जानकीबाई पाटील*

१

अतूळा मतूळा चरणी चतूळा
चरणीचे सोंडे हातपाय खणखणीत गोंडे
एक एक गोंडा विसाविसाचा
नागर साडे नेसायचा
नेसा ग नेसा मावल्यांनो
सात घरच्या पावण्यांनो
पावण्या गेल्या खोली
चितांग टाकलं डोली
चिटक्या मिटक्या करंडफूल
ते बाई फूल मी तोडीलं
हादग्या देवा वाहिलं
हादग्या तुझा तुरारा
मोतीयाचा भरारा
बाईच्या परसात लिंबारा
लिंबारा खाल्ला गाईनं
गाई गाई दूध ग
दूध दिलं बाप्पाला

बाप्पा बाप्पा अंगारा
अंगारा दिला आईला
आई आई लुगडं ग
लुगडं दिलं बहिणीला
बहिणी बहिणी धोतर ग
धोतर दिलं भावाला
भावा भावा गोंडे दे
माळावरचे धोंडे घे

२

कोथींबिरी बाई ग
आता कधी येशील ग
आता येईन चैत्रमासी
चैत्रा चैत्रा लवकर ये
हस्त घालीन हस्तारा
देव बसविन देव्हारा
देव्हाऱ्याच्या चौकटी
उठता बसता लाथाबुक्की

३

बाईच्या परसात भेंडीचं झाड
लव लव डहाळे लवतील ग

अंबारी मामा येतील ग
फुल फुल साड्या घेतील ग
लांब लांब पदर काढीन ग
लांब लांब पदर जरतारी
आमचे मामा व्यापारी
तोंडात चिकणी सुपारी
सुपारी गेली गडगडत
मामा आले बडबडत

४

डेरा ग डेरा मांडीला अवधानी
त्या बाई डेऱ्यात कायसं घुमतं
काढा रवी बघूंदे आम्हाला
तिकडून आले कृष्णाजी दातार
कृष्णाजी कृष्णाजी दान द्या
निळ्या घोडीवर बसून जा
निळी घोडी वाकली
सखुबाई सुंदर हासली
सखुबाई आपल्या आंगणी
सुंदर चाफा लावूनी
सुंदर चाफा फुलला

चला बाई कळ्या तोडायला
आम्ही बाई कळ्या तोडील्या
चला बाई हार गुंफायला
आम्ही बाई हार गुंफीला
हारा हारा प्रेमाळी
बागेत आले वनमाळी
रात्र झाली गोकूळी

५

पानपुडा की शंकरचुडा की शंकर चूडा
मामा माझा की लेकुरवाळा की लेकुरवाळा
त्याच्या घरी की दुभतंच काही की दुभतंच काही
सोळा म्हशी नी आठच गाई की आठच गाई
मामा पावणे आले बाई की आले बाई
त्यांना जेवायला काय काय करू की काय काय करू
त्यांना जेवायला साखर उंडे की साखर उंडे
मामा सांगे की मामी भांडे की मामी भांडे
त्यानी आणली की तेलंग साडी की तेलंग साडी
नेसुन गेले मी यमुना तिरी की यमुना तीरी
तिथं होते की धाकले दीर की धाकले दीर
उचलुन घेतले मी कडेवर की कडेवर

माझी मासूळी हरपली की हरपली
सासूबाईला कळूंन गेले की कळू गेले
दोन दोन चाबूक चमकाविले की चमकावीले
ते बाई चाबूक दूरच्या दूर की दूरच्या दूर
माझं माहेर पंढरपूर की पंढरपूर
माझं सासर रत्नांगिरी की रत्नांगीरी
पंढरपुरीची बांगडी साजे की बांगडी साजे
येता जाताना खुळखुळ वाजे की खुळखुळ वाजे

८ संग्राहिका
श्रीमती कमल लिघडे

१

हस्तका सोनीयाचा आरसा
फुलाई निघाली बारसा
फुलाई घालवत कोण कोण जाती
शीव बाई शंकर नाईक जाती
नायकानी तोडली मोगऱ्याची कळी
वास गेला नगरीच्या घरी
नगरीला जाऊन भोजन केले

भोजन करता लागली काडी
काडी मोडून बांधली माडी
माडी मोडून बांधलं तळं
त्या बाई तळ्यात परटीन धुणं धूती
विठोबाच्या टोपीला रंग देती
विठोबाची टोपी रंगाची
रुक्मिणीची चोळी भिंगाची

२

हस्त हा दुनीयेचा राजा
झुलतो हत्तीच्या फौजा
वरून चाकर इंद्राचा
पाऊस पाडी हस्ताचा
पड पड पावसा थेंबोथेंबी
थेंबोथेंबी आल्या लोंबी
पिवळ्या लोंबी आणूया
तांदूळ त्याचे कांडूया
मोदक लाडू बनवू या
हादग्या देवाला अर्पूया

३

हस्तक दिनियेचा राजा
तयासी नमस्कार माझा

नमस्कारा सरशी वारा
आधी आल्या मेघधारा
मागून आल्या मोठ्या धारा
धारा या दुधाच्या दृष्टी
तयानी पिकली सृष्टी
दहामधून सात गेले
हस्ताची मग पाळी आली
म्हणून त्याने गंमत केली
त्याच्या योगे झाला चिखल
त्या बाई चिखलात लावल्या केळी
एकेक केळ मोठालं
हादग्या देवा वाहिलं

४

बाईच्या परसात भेंडीचं झाड
लव लव ढाळ्या हालतील ग
वजीर मामा येतील ग
फुल फुल साड्या आणतील ग
फुल फुल साड्या नेसूंगा
लांब लांब पदर काढूंगा
लांब लांब पदर जरतारी
आमचे मामा व्यापारी

देव पुजतात दुपारी
तोंडात चिकणी सुपारी
सुपारी फुटता फुटेना
मामाला बायको ऐकेना

५

कायी नदीच्या पल्याड
कुणी पेरीला पदा राळा
एक लोंबार खुडून नेलं
चोळून मोळूनी राळं केलं
कांडुन कुटूनी तांदूळ केलं
तांदूळ घेऊनी बाजारी गेले
त्या बाई तांदळाच्या चवल्या पावल्या
चवल्या पावल्याचा ल्याली चुडा
घागर घेऊनी पाण्या गेली
घागर उचलता चुडा गेला
सासूबाईला कळू गेलं
चार चार चाबूक चमकावीलं

६

काळा काळा कोळसा झिग झिगवाणा
पालखीत बसला भुलोजी राणा

भुलोजी राणाचं काय काय लेणं
सरी बिंदल्या पिंपळपान
एक पिंपळ शेजारी
दुसरा पिंपळ दरबारी
दरबारीचं उभाक डोल
उभाक डोल वाजूंद्या
आमचा खेळ मांडूद्या
आमचा खेळ वेशीच्या दारी
पारवा घुमती बुरजावरी
पारव्या पंखाचं गुंजा गुंजा डोळं
उठला कावळा बसला भिंतीवर
कुणी हाकला राजाच्या लेकी

९ संग्राहिका
*सौ. कस्तुरबा चिवटे*

१

एक लिंबू झेलू बाई दोन लिंबू झेलू
तीन लिंबू झेलू बाई चार लिंबू झेलू

चार लिंबू झेलू बाई पाच लिंबू झेलू
पाचवा लिंबू पाणवठा
माळ घाली हनुमंता
हनुमंताची निळ्ळी घोडी
येता जाता कमळं तोडी
कमळाच्या पाठीमागे लपली राणी
अग अग राणी इथं कुठं पाणी
पाणी नव्हे यमुना जमुना
यमुना जमुनाची बारीक वाळू
तेथे खेळे चिलाळू बाळू
चिलाळू बाळाला भूक लागली
सोन्याच्या शिंपीने दूध पाजलं
नीज नीज चिलाळू बाळा
मी तर जाते वरच्या माळा
वरच्या माळा जाऊंगा
पाच खडे मांडूगा
एकेक खडा मोठा मोठा
गौराईच्या लागे पाटा
गौराय तुजं ठाणं ग
आता कधी येणं ग
आता येणं हस्ताला

देव बसवीन देव्हाऱ्या
देव्हाऱ्याच्या चौकटी
उठता बसता लाथाबुक्की
बाजारातनं आणला एकच आंबा
त्याचं केलं लोणचं
ते बाई लोणचं मामाजींना वाढलं
मामाजींनी शाबासकी दिली
ती बाई शाबासकी तांब्यात ठेवली
तो बाई तांब्या गंगेला वाहिला
गंगेनं मला पाणी दिलं
ते बाई पाणी शेताला पाजलं
शेतानं मला चारा दिला
तो बाई चारा गाईला चारला
गाईनं मला दूध दिलं
ते बाई दूध बगळ्याला पाजलं
बगळ्यानं मला पंख दिले
ते बाई पंख बुरडीणीला दिले
बुरडीणीनं मला बुट्टी दिली
ती बुट्टी मी माळणीला दिली
माळणीनं मला फुलं दिली
ती बाई फुलं मी हादग्याला वाहिली

२

हत्तीच्या सोंडेवर खेळेल बाळ
तुटेल साखळी पडेल गोळं
तुझ्या मावशीनं काय दिलं
माझ्या ग मावशीनं उंट दिला
असला कसला उंट बाई केळीचा खुंट

( हे गीत याच रीतीने पुढे म्हणावयाचे व म्हैस, कोंबडा, शेळी इत्यादींचा उंटाचे जागी उल्लेख करावयाचा आणि त्या त्या जनावराचे उणेदुणे त्यात सांगायचे. )

३

आला ग आला श्रावणी सोमवार
चला चला जाऊ रामेश्वराला
रामेश्वराची जत्रा पाहू
जत्रेमधली चित्रं घेऊ
नको बाई चित्रं पवित्र
सोन्याची साखर वाण्याची
शुद्ध गाईच्या रक्ताची
सांगितलेलं कळेना
मूर्खाची मान वळेना
मूर्ख म्हणे मी एकला

दारी आंबा पीकला
दारी आंब्याची कोय ग
खिरापतीला साखर ग
पोरी पळाल्या नागर ग

४

आवट बाई कवट ग
कवटीसनं आला कागद ग
त्यो बाई पडला गंगनात ग
गंगन माझी जाऊ
वड्या कशा कापीती
आचक मचक कापीती
कापताना देखीली
भाऊजींनी ठोकीली
का हो भाऊजी रूसला
काळा विंचू डसला
काळा विंचू पायी
रांजणाच्या काठी
रांजण गेला गडगडी
पाऊस आला धडधडी

# १० संग्राहिका

*सौ. प्रतिभा जाधव*

१

बाजारातून आणला रवा
रात्री भिजत घातला केव्हा
त्याची केली सुंदर नळी
तुपात तळली साखरेत घोळली
जिलबी बिघडली

हरिच्या नैवेद्याला केली जिलबी बिघडली
त्यातल एवढंस उरलं पीठ
त्याच केलं थालीपीठ
नेऊनी वाढलं पानात
जिलबी बिघडली

त्यातल एवढसा उरला पाक
त्याचा केला साखरभात
नेऊनी वाढला पानात
जिलबी बिघडली

त्यांतल एवढंसं उरलं तूप
मामंजींना लागली भूक
नेऊनी वाढीलं पानात
जिलबी बिघडली

२

कृष्णाचं अंगडं बाई कृष्णाचं टोपडं
शिंप्या घरी बाई शिवायला टाकीलं
धोब्या घरी बाई धुवायला टाकीलं
चंद्रभागेत खळबळलं जाई जुईवर पिळीलं
नागचाफ्यावर वाळीवलं
चंदनपाटावर घडी घातली
घडीचा घडी रंग बाई कृष्णाचा पलंग
त्याही रात्री जन्मले श्रीरंग
अळकळीत बाई कळकळीत
समजा म्हणे समजावित
नऊ मासे चारं भारी
पडसं आलं त्यामुळं हरी
सुंठ मिसे आवळकाठी
त्यामध्ये मिसळून साखरपीठी

ऐसा कृष्ण मोठा घाटा
ओवाळून टाका मोहरी मीठा

३

सखुबाई तुमच्या अंगणी
सुंदर चाफा लावोनी
ऐसा चाफा फुलेल ग
चला बाई कळ्या तोडायला
आम्ही बाई कळ्या तोडील्या
आम्ही बाई हार गुंफीले
हारा हारा प्रेमाळी
तिकडून आले वनमाळी
सोडा फेडा काचोळी
रात्र झाली गोकुळी
सोनियाची साखळी
माझी वेणी मोकळी
साखळी दिली मी वाण्याला
वाण्या वाण्या हळकुंड दे
हळकुंड दिलं मी गौराईला
गौराई गौराई शोभक दे
शोभक दिलं मी नदीला

नदी नदी पाणी दे
पाणी दिलं मी झाडाला
झाडा झाडा फुलं दे
फुलं दिली मी देवाला
देवा देवा अंगारा दे
अंगारा दिला मी बापाला
बापा बापा साडी दे
साडी दिली मी आईला
आई आई चोळी दे
चोळी दिली मी बहिणीला
बहिणी बहिणी वाक्या दे
वाक्या दिल्या मी भावाला
भावा भावा गोंडे दे
माळावरचे घोंडे घे

४

माझ्या माहेरीच्या वाक्या गुजरीच्या
तुझ्या ग माहेरच्यानी तुला काय दिलं ?
माझ्या ग माहेरच्यानी मला दिल्या पाटल्या
असल्या कसल्या पाटल्या बाई हाताला दाटल्या

माझ्या माहेरीच्या वाक्या गुजरीच्या
तुझ्या ग माहेरच्यानी तुला काय दिलं ?
माझ्या ग माहेरच्यानी मला दिली सरी
असली कसली सरी बाई गळ्यात बांधली दोरी

माझ्या माहेरीच्या वाक्या गुजरीच्या
तुझ्या ग माहेरच्यानी तुला काय दिलं ?
माझ्या ग माहेरच्यानी मला दिले गोठ
असले कसले गोठ बाई कणकेचे रोट

माझ्या माहेरीच्या वाक्या गुजरीच्या
तुझ्या ग माहेरच्यानी तुला काय दिलं ?
माझ्या ग माहेरच्यानी मला दिला उंट
असला कसला उंट बाई बाभळीचा खुंट

माझ्या माहेरीच्या वाक्या गुजरीच्या
तुझ्या ग माहेरच्यांनी तुला काय दिलं ?
माझ्या ग माहेरच्यांनी मला दिला हत्ती
असला कसला हत्ती बाई उधळीतो माती

५

अैलमा पैलमा गणेश देवा
माझा खेळ मांडून दे करीन तुझी सेवा

मांडला ग मांडला वेशीच्या दारी
पारवळ घुमतंय बुरुजावरी
पारवळ फकीराचे गुंजावानी डोळे
गुंजावानी डोळ्यांच्या सारविन टिक्का
आमच्या गांवच्या भुलोजी नायका
ऐवीन गा तेवीन गा
कांडा तीळ बाई तांदूळ घ्या
आमच्या आया तुमच्या आया
खातील काय दूधमांडे
दूध मांड्याशी लागली टाळी
आयुष्य दे रे ब्रम्हाळी
माळी गेला शेता भाता
पाऊस पडला येता जाता
पड पड पावसा थेंबोथेंबी
थेंबोथेंबी आल्या लोंबी
आल्या ग लोंबी अंकणा
अंकणा तुझी सात कणसं
हादग्या तुझी सोळा वर्षं

६

अक्कण माती चिक्कण माती खळगा जो खणावा
अस्सा खळगा सुरेख बाई जातं ते रोवावं

अस्सं जातं सुरेख बाई रवा पिठी काढावी
अश्शी रवा पिठी सुरेख बाई करंज्या कराव्या
अश्या करंज्या सुरेख बाई तबकी भराव्या
अस्सं तबक सुरेख बाई शेल्यानी झांकावं
अस्सा शेला सुरेख बाई पालखीत नेऊन ठेवावा
अश्शी पालखी सुरेख बाई माहेरी धाडावी
अस्सं माहेर गोड बाई खायाला सापडतं
अस्सं आजोळ गोड बाई खेळायला सापडतं
अस्सं सासर द्वाड बाई कोंडूनी मारीतं

७

माझ्या सुंदरीचं लगीन
वऱ्हाडी कोण कोण जाणार
माझ्या सुंदरीचं लगीन

आई म्हणे मी आई
करीन लग्नाची घाई
माझ्या सुंदरीचं लगीन

बाप म्हणे मी बाप
देईन हुंडा लाख
माझ्या सुंदरीचं लगीन

चुलता म्हणे मी चुलता
येईन कामा पुरता
माझ्या सुंदरीचं लगीन

चुलती म्हणे मी चुलती
येईन कामा पुरती
माझ्या सुंदरीचं लगीन

मामा म्हणे मी मामा
येईन कामा धामा
माझ्या सुंदरीचं लगीन

मामी म्हणे मी मामी
येईन कामी धामी
माझ्या सुंदरीचं लगीन

आजा म्हणे मी आजा
खाईन तूप सांजा
माझ्या सुंदरीचं लगीन

आजी म्हणे मी आजी
खाईन तूप सोजी
माझ्या सुंदरीचं लगीन

भटीण म्हणे मी भटीण
सर्वांच्या पोळ्या लाटीन
माझ्या सुंदरीचं लगीन

भट म्हणे मी भट
धरीन अंतरपाट
माझ्या सुंदरीचं लगीन

११ संग्राहिका
सौ. गीता भोसले

१

आंबा जो मुरीला
त्या बाई आंब्याचं मी लोणचंसं घातीलं
ते मी लोणचं हातग्या देवाला वाहिलं
अळकळीत की कळकळीत
समजावूनी मी रमजावीत
नऊ मासे वाटेवरी
पडसे आले श्रीहरी
सुंठ मिरे आवळकट्टी

त्यामधूनि मिसळूनी साखरपिठी
हिरडा भेहडा पिंपाळी
सातक डेरीयाचं लोणी
खाऊन पडला शारंगपाणी
असा कृष्ण मोठा धीट
ओवाळूनी टाका मोहरी मीठ
अननस पपनस फणस अंबा
वरती सीताफळ लावू ग
सगळ्या मिळून हातगा खेळू ग

२

हस्तक दिनीयाचा राजा
पावतो तिनीयाच्या काजा
तयासी नमस्कार माझा
नमस्कारा सरशी वारा
आधी पडल्या मेघधारा
मागूनी पडल्या मोठ्या धारा
धारा या दुधाच्या दिसती
त्याने ग पिकं ही पोसती
दहा मधले सात गेले
हस्ताची मग पाळी आली

पडून त्याने गंमत केली
जाई जुई शेवंती चमेली
गुंफुनी ठेविले हारी
दुधातले दुधपेढे सत्यभामा नारी
वाट पहाते मंदिरी

३

एवढं एवढंसं पांखरू
लाल लाल ग त्याची चोच
गुंजावनी ग त्यांचे डोळे
सातभातानी बाळ खेळे की पाखरू माझं
दह्यादुधानी भरल्या वाट्या
वर साखर लाह्यापीठ
सातभातानी बाळ खेळे ....

(सर्व प्रकारांच्या पक्वान्नांची नावे घ्यावयाची व याच रितीने पुढे हे गीत म्हणावयाचे.)

## १२

संग्राहक
*सौ. विमलाबाई प्रभाकर देवस्थळी*

१

रंगू गंगू तंगू ग
चला जाऊ हदगा घालू

खिरापती ह्या किती तऱ्हेच्या
करंज्या लाडू मोदक ग
चला जाऊ हदगा घालू ग

केळी नारळी पपनस आंबे
वरती गुलाब लावू ग
चला जाऊ हदगा घालू ग

२

आड बाई अडवणी
अडाचं पाणी खारवणी
अडात होत्या बायका
अंगी टोपी नायका
अंगी टोपी हरवली
सर्पा पायी दडपली
सर्प म्हणे एकुला
दारी आंबा पिकुला

दारी अंब्याची कोय ग
अंगणी नाचती मोर ग

३

भोपळीचं फूल ग बाई फूल रंजना
माळ्याची काठी बाई माळ रंजना
माळ्याने सांडली ग बिंबाळी
हुडकून देरे भीमसेना
हुडकल्यानं गवसेना

४

आज मथुरेचा बाजार झाला उशीर
कशी रे धरलीस माझी वेळ
घरी आहे तान्हं बाळ
रडून रडून करील गोंधळ
सोडा हरी पदर

कशी रे धरलीस माझी वाट
घरी आहे सासू खाष्ट
करील कामाचा बोभाट
सोडा हरी पदर

कशी रे धरलीस माझी वेणी
घरी आहे घरचा धनी
करील कामाची धूळधाणी
सोडा हरी पदर

५

धाकुटी चंद्रावळ बाई खेळती अंगणी
खेळता खेळता बाई कृष्णानी देखिली
कृष्णानी देखिली बाई पालवा धरिली
सोड सोड पालवा मी तिकडे जाईन
तिकडे जाईन ती वैताक घेईन
वैताक घेईन मी बाबळ जे तोडीन
बाबळ जे तोडीन मी सुतार जे होईन
सुतार जे होईन मी चौरंग जे घडवीन
चौरंग जे घडवीन मी कळ्या जे तोडीन
कळ्या ज्या तोडीन मी हार जे गुंफीन
हार जे गुंफीन मी हातग्याला वाहीन

६

एवढंसं होतं पंढरपूर
एवढंसं होतं पंढरपूर

विठोबारायाचं नगर
रखमाबाईचं सासर
विठोबाराया दारोदारी
शंभो मोट मोट धारी
अग अग भुलाई माळणी
तुला राजा बोलावितो
तुला कंगण्या घडवितो
जळो मेल्याचा कंगण्या
विकीन सोनीयाची भाजी
घेईन मोतीयाचा तेजी
माझा माळी जो बरवा
दंडी रुमाल हिरवा
दंडी रुमाल काय काय परी
हिरा झळकतो तुऱ्या परी

७

पानपुडा की शंकरचुडा की शंकरचूडा
माझा मामा की लेकुरवाळा की लेकुरवाळा
मामांच्या घरी दुभतंच काही की दुभतंच काही
सोळा म्हशी की दोन च गाई दोन च गाई
मामा पाहुणा आला बाई ग आला बाई

साकरउंडे की दोनच मांडे कीं दोन मांडे
मामासकट मामी भांडे की मामी भांडे
मामा गेला ग तेलंगपुरा की तेलंगपुरा
तेलंगपुरासनी आणली साडी ग आणली साडी
नेसून गेले मी बरव्या पाण्या की बरव्या पाण्या
तेथे होता ग धाकटा दीर की धाकटा दीर
उतरून घेतला मी कडेवरी की कडेवरी
चार चाबूक चमकाविले की चमकाविले
माझं आजोळ रत्नागिरी ग रत्नागिरी
रत्नागिरीच्या टांकावरी ग टांकावरी
शेला वाळतो चाफ्यावरी ग चाफ्यावरी

८

कोथिंबिरी बाई ग
आता कधी येशील ग
आतां येईन श्रावणमासी
श्रावणा श्रावणा लवकर ये
तुला घालीन हौसरी
हौसरीचा चोळा मोळा
देव बैसले देव्हारा
देव्हाऱ्याच्या चौकट्या
उठता बसता लाथाबुक्क्या

९

आरडी बाई परडी ग
परडी येवढे फूल ग
दारी मूळ कोण ग
दारी मूळ सासरा
सासऱ्यानं आणील्या पाटल्या
येत नाही बरोबर
बसत नाही घोड्यावर

आरडी बाई परडी ग
परडी येवढे फूल ग
दारी मूळ सासू
सासूनं आणील्या साखळ्या
येत नाही बरोबर
बसत नाही घोड्यावर

आरडी बाई परडी ग
परडी येवढे फूल ग
दारीं मूळ दीर
दिरानं काय आणिलं
दिरानं आणिले वाळे
येत नाही बरोबर
बसत नाही घोड्यावर

आरडी बाई परडी ग
परडी येवढे फूल ग
दारी मूळ नणंद
नणंदेनं काय आणिलं ग बाई
नणंदेनं आणिले गोट ग
येत नाही बरोबर
बसत नाही घोड्यावर

आरडी बाई परडी ग
परडी येवढे फूल ग
दारी मूळ कोण ग
दारी मूळ पति
पतीनं काय आणिलं ग बाई
पतीनं आणिली नथ
येते तुमच्या बरोबर
बसते तुमच्या घोड्यावर
आरडी बाई परडी ग

१०

एवढासा तांदूळजा
नखांनी खुडिला

भारा जिऊ बांधिला
वेशी बाहेर टाकून दिला
गाय आली हुंगून गेली
म्हैस आली खाऊन गेली
म्हशीला जाहाला रेडा
गाईला झाला पाडा
तोच रेडा पाडा माझ्या बापाजीचा वाडा
बापाजीनं दीला जांभळा घोडा
जांभळा घोड्यांची नीटकी चाल
जेथे पाऊल पडे तेथे केडगाव शहर
केडगावचे रूंद रूंद ठश्शे
ठश्शे ठश्शे अंबर बुश्शे

११

काळा कोळसा झिक झिक राणा
पालखीत बसला घुलोजी राणा
घुलोजीची घोडी कितक्याची
नाईग हाम्मा मोत्याची
मोती खरडून शष्कूल
शष्कूलाच्या टिका ग
टिका टिका म्हणूनी नगराशी जाता

नगरासी जाता भोजन करिता
भोजन करिता लागली काडी
काडी मोडून बांधली माडी
माडी मोडून बांधले तळे
त्या बाई तळ्यांत परिट कोण धुतो
विठोबाच्या टोपीला निळा रंग देतो
रखमाईच्या चोळीला शाहारंग देतो

१२

काळी चंद्रकळा नेसू कशी
गळ्यांत हार वाकू कशी
पायांत पैंजण चालूं कशी
बाहेर मामंजी बोलूं कशी
दमडीचं तेल आणू कशी
दमडीचं तेल आणीलं
सासूबाईचं न्हाणं जाहालं
वन्सबाईची वेणी जाहाली
भाऊजीची शेंडी जाहाली
मामंजीची दाढी जाहाली
उरलं तेल झाकून ठेविलं
लांडोरीचा पाय लागला

वेशी बाहेर ओघळ गेला
त्यांत रेडा वाहून गेला
सासूबाई सासूबाई अन्याय जाहाला
एवढा अन्याय पोटात घाला
दूध-भात जेवायला घाला

१३ संग्राहिका
सौ. शरदिनी मोहिते

१

आला चेंडू गेला चेंडू
राया चेंडू झुगारिला
आपण चाले हत्ती घोडे
राम चाले पायी
राम ग वेचितो कळ्या
सीता ग गुंफिते माळा
आल्या ग लगीन वेळा
आकाशी घातिला मंडप
जरतारी घातीलं बोहलं
जरम्‌जरती बसले पती

पतीन पती तिरुबाई राळा
तिरुबाई राळा मुंजाबाळा
मुंजाबाळाची मुंजक दोरी
तीच दोरी सावध मारी
सावधा सावधा सर्वतकाळ
सर्वतकाळचा दोर
आणा दोर बांधा चोर
बांधा चोर बाई झाडाशी
झाड झटकं फूल टपकं
ते बाई फूल मी तोडीलं
बहिणी माथा खोवीलं
बहिणा तुझी वेणी ग
सोनीयाची फणी ग
बहिणा तुझा खोपा ग
उंदीर घेतो झोपा ग

२

आमच्या परसात मेंडीचं झाड
लवलव डहाळ्या हालतिल ग
अंबरमामा बाई येतील ग
फुल फुल साड्या बाई आणतिल ग

फुल फुल साड्या बाई नेसू ग
लांब लांब पदर काढू ग
लांब लांब पदर जरतारी
आमचे मामा व्यापारी
तोंडांत चिकणी सुपारी
सुपारी गेली फुटून
मामा आले उठून

३

माझी वेणी मोकळी
सोनीयाची साखळी
साखळी देऊ देवाला
देवा दे मला अंगारा
अंगारा देऊ आईला
आई दे मला साडी
साडीच्या पदरी रूपया
भाऊ माझा शिपाया

१४ संग्राहिका
डॉ. सरोजिनी बाबर

१

वाजे चौघडा रूणझुण
आला ग हादगा पाहुणा
दारी तुळस दऊणा
जाई जुई शेवंती दुपारी
फुले ग नानापरी
हार गुंफीते कुसरी
वहाते मी हादग्या परी
हादगा देव मी पूजीते
लवंगा सुपाऱ्या वेलदोडे
करून ठेविले विडे
आणखीन् दुधातले दूधपेढे
वहाते मी हादग्यापुढे
हादगा देव मी पूजीते

२

येवढं येवढंसं पाखरू माझं
लाला ग त्याची चोच

गुंजावाणी ग त्याचे डोळे
सप्तपाताळी बाळ खेळे की पाखरू माझं

कोण्या बाजाराशी ग गेलं
कोण्या नारीनं खुणावलं की पाखरू माझं

दह्या दुधानी भरल्या वाट्या
वर साखर रायपुरी
माझा जेवणार नानापरी की पाखरू माझं

दुधा तुपानी भरल्या वाट्या
वर साखर रायपिठी
माझा जेवणार जगजेठी की पाखरू माझं

लोण्या ताकानी भरल्या वाट्या
वर साखर चवीयीला
आला गोविंद जेवायला की पाखरू माझं

हस्तीदंती ग आणा फणी
जावळ विंचरूनी घाला वेणी
लिंब कढवूनी घाला पाणी की पाखरू माझं

सोनीयाचा ग पाळयीणा
मोतीयाची ग लावली दोरी
पुढं हालवीते राधा नारी की पाखरू माझं

३

हातुका मातुका चरणी चतुका
चरणीच्या सोंडेवरी
बाळ खुळ खुळ गोंडेवरी
एकेक गोंडा विसाविसाचा
नागरसाड्या नेसायचा
नेसा ग नेसा मावल्यांनो
सात घरच्या पाव्हण्यांनो
पाव्हण्या गेल्या खोली
सीतानं टाकली डोली
चिटक्या मिटक्या करंडफूल
ते बाई फूल मी तोडीलं
हातग्या देवा वाहीलं
हातग्या तुझा तुरारा
मोतीयाचा भुरारा
मैनी तुमचा चांद वो
मोतीयाचा भांग वो
चांदासरशी निळ्ळी घोडी
येता जाता कमळं तोडी

१५ संग्राहिका
सौ. शकुंतला पवार

माळ्याची माळ बाई रंगेना
झाडाचं फूल बाई उमलेना
माळ्यानं सांडली भिकबाळी
हुडकून दे रे बा माळी
सर्प म्हणे मी एकुला
दारी आंबा पिकुला
दारी आंब्याची कोय ग
खिरापतीला काय ग

१६ संग्राहिका
कु. विद्या देसाई

१

डेरा ग डेरा मांडीला अवधानी
त्या बाई डेऱ्यात कायसंसं घुमतं
घुसळण घुसळी राधिका गवळण
तिकडून आले कृष्णाजी दातार

कृष्णाजी कृष्णाजी दान द्या
निळ्या घोडीवर बसून जा
निळी घोडी वाळली
सखुबाई सुंदर हासली
सखुबाई तुमच्या अंगणी
सुंदर चाफा लावूनी
ऐसा चाफा फुलला
चला बाई कळ्या तोडायला
आम्ही कळ्या तोडील्या
आम्ही बाई हार गुंफिले
हारा हारा चाफेळी
रात्र झाली गोकुळी

२

एवढासा तांदूळ बाई नखांनी खुडीला
भारा जी बांधीला बाई येशीभाईर टाकीला
गाय आली हुंगून गेली
म्हैस आली खाऊन गेली
म्हशीला झाला बाई रेडा
गाईला झाला बाई पाडा
तोच रेडा पाडा बाई बापाजीचा वाडा

बाबाजींनी घेतली जांभळी घोडी
जांभळ्या घोडीची नेटकी चाल
जिथं पाऊल पडलं तिथं कोल्हापुरी शाल
कोल्हापुरी शाल बाई उंदरून दिशी
ठसा पडंल बाई चोळी चोळी देशी
ठस्सा मस्सा अंबर घस्सा
अंबरात पडली काडी
तीच काडी उप्पर माडी
उप्पर माडीवर कमळाचं तळं
त्या बाई तळ्यात परटीन धुती
विठूच्या टोपीला निळा रंग देती
विठूची टोपी बाई रंगाची
रखमाईची चोळी बाई भिंगाची

३

एक लिंबू झेलू बाई
दोन लिंबू झेलू
बारा लिंबाची सेवा करू
हनुमंताला माळ घालू
हनुमंताची निळ्ळी घोडी
येता जाता कमळं तोडी

अग अग राणी
इथं कुठं पाणी
वरच्या डोंगराचं आणा पाणी
आमच्या गावचा नवलक माळी
त्यानं लावली करवंद्जाळी
करवंद जाळींचं पाटूळं
पाटूळं सोगा जी लोळू द्या
आडवा गोपा जी खेळू द्या
आमचा भोंडला घूमू द्या

१७ संग्राहिका
सौ. नलिनीबाई शिंदे

सासरच्या वाटं कुचकुच काटं
कोण पावणा आला ग सई .... हूं .... हूं
सासरा पावणा आला ग सई .... हूं .... हूं
काय घेऊन आला ग सई .... हूं .... हूं
गाडी घेऊन आला ग सई .... हूं .... हूं
गाडीची बैलं खरताडी
वर बसाला कैकाडी

त्याच्या गाडीत मी बसायची न्हाई
त्याच्यासंगं मी जायाची न्हाई .... हूं .... हूं

दिराच्या वाटं कुचकुच काटं
कोण पावणा आला ग सई .... हूं .... हूं
दीर पावणा आला ग सई .... हूं .... हूं
काय घेऊन आला ग सई .... हूं .... हूं
तोंडे घेऊन आला ग सई .... हूं .... हूं
त्याचे तोंडे मोडके
त्याचे गळ्यात फडके
त्याचे तोंडे मी लियाची न्हाई
त्याच्यामागं मी जायाची न्हाई .... हूं .... हूं

सासूच्या वाटं कुचकुच काटं
कोण पावणी आली ग सई .... हूं .... हूं
सासू पावणी आली ग सई .... हूं .... हूं
काय घेऊन आली ग सई .... हूं .... हूं
पाटल्या घेऊन आली ग सई .... हूं .... हूं
तिच्या पाटल्या सडक्या
जशा भिंगाच्या खिडक्या
तिच्या पाटल्या मी लियाची न्हाई
तिच्या मागं मी जायाची न्हाई .... हूं .... हूं

नवऱ्याच्या वाटं कुचकुच काटं
कोण पावणा आला ग सई .... हूं .... हूं
नवरा पावणा आला ग सई .... हूं .... हूं
काय घेऊन आला ग सई .... हूं .... हूं
घोडं घेऊन आला ग सई .... हूं .... हूं
त्याच्या घोड्याव मी बसणार
माझ्या पुढनं ते चालणार
त्यांच्या मागं मी जाईन सई .... हूं .... हूं
गुजगुज गोष्टी मी बोलीन सई .... हूं .... हूं

## १८

संग्राहिका
*सौ. मंगला नावडीकर*

सोन्याचा करंडा बाई मोत्याचं झाकण
तिथं आमच्या सासूबाई कुंकू लावत होत्या
सासूबाई सासूबाई मला आलं मूळ
मला काय पुसतीस बरीच दिसतीस
पुस जा आपल्या सासऱ्याला

सोन्याची दौत बाई मोत्याची लेखणी
तिथं आमचे मामंजी पत्र लिहित होते
मामंजी मामंजी मला आलं मूळ
मला काय पुसतीस बरीच दिसतीस
पुस जा आपल्या दिराला

सोन्याचा दांडू बाई मोत्याची विटी
तिथं आमचे भाऊजी खेळत होते
भाऊजी भाऊजी मला आलं मूळ
मला काय पुसतीस बरीच दिसतीस
पुस जा आपल्या जावेला

सोन्याचा डेरा बाई मोत्याची रवी
तिथं आमच्या जाऊबाई ताक करीत होत्या
जाऊबाई जाऊबाई मला आलं मूळ
मला काय पुसतीस बरीच दिसतीस
पुस जा आपल्या नंनदेला

सोन्याची सुपली बाई मोत्यांना गुंफली
तिथं आमच्या वन्स पाखडीत होत्या
वन्सं वन्सं मला आलं मूळ
मला काय पुसतीस बरीच दिसतीस
पुस जा आपल्या पतीला

पतिराज पतिराज मला आलं मूळ
आणा फणी घाला वेणी जाऊंद्या राणी माहेरा
आणली फणी घातली वेणी
गेली राणी माहेरा माहेरा

• • •

**अनुक्रम –**

# हातगा ऊर्फ भोंडले

*कै. वि. का. राजवाडे*

१ महाराष्ट्रात हातग्याची उर्फ भोंडल्याची गाणी घरोघर मुलींच्या सर्वतोमुखी आहेत. हस्त नक्षत्राच्या प्रारंभापासून शेवटल्या दिवसापर्यंत दररोज एकेक गाणे वाढवीत सोळाव्या दिवशी सोळा गाणी म्हणतात. शेजारच्या पाजारच्या दहापांच मुली तिसऱ्या प्रहरी एकत्र येतात. वेचून आणून चार खडे मांडतात व हातगा म्हणून त्यांची फुलांनी व पानांनी पूजा करतात आणि नंतर फेर धरून ही गाणी म्हणतात. हातगा म्हणजे हस्तग्रह. भोंडले किंवा भोंडला म्हणजे काय ते समजत नाही. ह्या शब्दाचा अर्थच माझ्या ध्यान्यांत येत नाही. व्युत्पत्तिहि माहित नाही. हातग्यालाच दुसरे नांव भोंडले असावे. परंतु निश्चयाने काहीच सांगता येत नाही.

२ गाण्यात प्रारंभ एका विषयाचा असतो व शेवट त्या विषयाला सोडून निराळाच काही असतो. उदा. पहिले गाणे. ह्या गाण्यात प्रथम गणपतीचे नांव घेतले आहे. ते रास्तच आहे. ते अयलमा म्हणजे अथम व पयलमा म्हणजे प्रथम.

अथ + ल + म = अहलम = अअलम = अयलम = अयलमा (सप्तमी)
प्रथ + ल + म = पहलम = पअलम = पयलम = पयलमा (सप्तमी)

---

या गाण्यात पाठभेद फार आहेत व ही गाणी म्हणण्याच्या वेळा प्रांतोप्रांती निरनिराळ्या आहेत. शिवाय गाण्यांची संख्या ही क्वचित जास्त आहे. (ही गाणी या विवेचनाचे शेवटी दिलेली आहेत).

नंतर गणेशाला मुलगी प्रार्थिते की, माझा खेळ मांडण्यास अनुज्ञा दे. खेळ गांवच्या वेशीच्या दारात मांडिला. तो वेशीच्या बुरजावर पारवा घुमत होता त्याकडे लक्ष्य गेले. तो फकिरासारखा एकटाच होता. त्याचे डोळे गुंजेप्रमाणे लाल होते. त्याच्या दृष्ट डोळाच्या टीका गांवच्या भुलोजी नावाच्या नाईकाने उर्फ पाटीलाने काढून टाकिल्या. नंतर मुली वेशीच्या दारी पुन्हा खेळ खेळू लागल्या. तीळ कांडून त्यांचे त्यांनी पांढरे तांदूळ काढीले. त्या तांदूळाचे साऱ्या मुलींच्या आयांकरिता दूधउंडे केले. ते दूध-उंडे खाता खाता मुलींच्या आयांचे टाळे बसले. तेव्हा जवळच माळी होता. त्याजवळ मुलींनी औषध मागितले. औषध आणावयास माळी शेतास गेला. तो पाऊस आला. थेंबाथेंबी पडू लागला. धान्याला ओंब्या आल्या त्या आपल्या वजनाने लोंबू लागल्या. एकेका आंकणाला सात सात कणसे धरली. असे हस्ताच्या भरपूर पावसाचे एक ना दोन सोळा वर्षाव झाले. वर्षे हा शब्द वर्षाव या अर्थी योजिला आहे. असा ह्या पहिल्या गाण्याचा मतितार्थ आहे. गाणे मोठे नामी आहे. कल्पना उड्यावर उड्या घेत आहेत. एकेका कल्पनेचे शब्दचित्र एकेका ओळीत मोठ्या चातुर्याने व औत्कंठ्याने रेखाटले आहे. ह्या शब्दचित्रात इतिहास खचून भरलेला आहे. हे शब्दचित्र जेव्हा रचिले गेले त्या काळी कोणतेही कृत्य आरंभण्यापूर्वी प्रथम गणपतीपूजन करीत. त्या काळी गावातल्या मुली गावच्या वेशीवर येऊन कांही खेळ खेळत. गांव म्हटला म्हणजे त्याला कुसूं, बुरूज व वेस ह्या तीन वस्तू त्या काळी हटकून असावयाच्याच. गांव वेशीवर पारवे घुमत. इतक्या त्या जुन्यापुराण्या झालेल्या होत्या. मुसलमानी अंमल झालेला होता व गावोगाव फकीर व दर्गे मातलेले होते. फकीर निशा करून असत व त्यांचे डोळे लालगुंज झालेले असत. त्यांची दृष्टी गावच्या स्त्रियांवर जाई. तेव्हा पाटील त्यांचे डोळे काढून टाकी. म्हणजे ऐन मुसलमानी अंमल ढिला पडत चालला होता. गान रचनाकाळी तिळांचे

उंडे हे प्रिय पक्वान्न होते. माळी लोकांना सामान्य रोगावर सामान्य वनस्पती माहीत असत. अमरकोशांत वनस्पतिसंग्रह आहे तो उगाच नाही. सामान्य लोकातही वनस्पतीचे ज्ञान त्या काळी कामापुर्ते बरे असे. हस्ताचे पाऊस पडून धान्य मुबलक येई. अशी त्या काळी समाजस्थिती होती. तिचे हे सूचक शब्दचित्र आहे. एकेका वाक्याने हजारो इतर कल्पनांचे आद्य डोळ्यांपुढे उभे रहातात. म्हणजे ह्या गाण्यांत काव्य आहे. तात्पर्य, हे गाणे बहुतच बहुत गोड आहे व लहान मुलींच्या डोक्यात नाना तरंग उठविणारे आहे. गांव, कुसूं, बुरूज, पाखरे, देवळे, शेतकरी, फकीर, चित्रविचित्र शेते व पाऊस वगैरे मानव व सृष्ट चमत्कारांचे हे नामी चित्र आहे.

३ गाणे दुसरे : श्रावणात व भाद्रपदात लिंबाला अतिभर येतो. तेव्हा ती लिंबे मुली झेलतात. मग पांच लिंबांची माळ करतात. हणमंताचे देऊळ पाणवठ्याला असे. हणमंताची निळी घोडी जाता येता कमळ तोडी. कमळाच्या आड एक चिमुकली असरा होती तिला मुली विचारतात की पाणी कुठे आहे. ती उत्तर देते, "ही यमना जमना आहे. नुसते रोजचे पाणी नाही." यमुनेच्या बारीक वाळूवर यादवकुळा टिळक जो बाळकृष्ण तो खेळतो. त्याला भूक लागली. तेव्हा सोन्याच्या शिंपीने दूध पाजिले आणि मग त्याला झोपी लावले. नंतर मुली माळावर खडे वेचावयाला गेल्या. त्या खड्यात एक मोठा खडा असेल त्याला गवरा म्हणतात. गवरीचा नवरा तो गवरा. गवऱ्याला मुली विचारतात, "बा, कधी येशील?" चैत्रात येईन, म्हणून तो सांगतो, तेव्हा मुली चैत्राला म्हणतात, "चैत्रा चैत्रा लवकर ये." म्हणजे हातग्याला हात घालू व देव्हाऱ्यात देव बसवू. नंतर देव बसविल्यानंतर देव्हाऱ्याच्या चवकटीपुढे मुली नाचतात व म्हणतात : देव्हाऱ्याच्या चवकटी, उठता बसता लाथबुक्की.

या गाण्यात लिंबे, हणमंत, निळी घोडी, कमळे, असरा व गवरा ह्यांचा उल्लेख आला आहे. सर्वच कल्पना अतींद्रिय आहेत. मारूती, अप्सरा व गवरे, एतत्संबंधी भूतसृष्टीतील ज्या काल्पनिक गोष्टी समाजात त्या, त्या काळी प्रचलित होत्या त्यांचे वर्णन ह्या गाण्यात आले आहे. एकंदरीत गाण्याचा अर्थ सोपा नाही. गूढ आहे.

४ गाणे तिसरे : गावात एक खाऱ्या पाण्याचा आड आहे. तोच कल्पनासृष्टीला व शब्दचित्राला पाया म्हणून घेऊन, त्याच्यावर कल्पना चालविल्या आहेत. खाऱ्या आडाच्या खाऱ्या पाण्यात वडील बाया मुलांच्या आंग्या टोप्या धूत आहेत. इतक्यात आडांत साप निघाला व आंग्या टोप्या हरवल्या. आळ सापावर आला. साप म्हणतो मी एकुलता एकटा आहे. दारच्या पिकल्या आंब्याला विचारा. तो खरेच आंब्याची कोय दारी पडली होती. लुच्चा आंबा आंग्या टोप्या घेऊन पळाला. पण आपली कोय न्यायला विसरला. त्यामुळे उमगला. आंब्याची झडती घेणे जरूर झाले. आंब्यावर मोर नाचू लागले. बायांनी दिवट्या घेऊन आंग्या टोप्यांचा शोध चालविला. इकडे मुली आपला खेळ खेळू लागल्या व खेळताना म्हणतात : "आम्ही सुंदर मुली डोळचात सुंदर काजळ घालू व सासरमाहेर करू, आमचे सासर माहेर इतर घराप्रमाणे साधे नाही, गबर आहे. तेथे मातीच्या चुली नाहीत, तांब्याच्या चुली आहेत." मुली मलकापूरच्या होत्या. मलकापूर या शब्दाचा खरा उच्चार मलकान्पूर. मलिक याचे फारशी अनेकवचन मलकान्. मलकांचे जे शहर ते मलकानपूर. त्याचा मुलींनी अपभ्रंश मलकामपूर असा केला. मलकापूर हे गांव कोल्हापूर इलाख्यात आहे व तेथील प्रतिनिधींची सध्या राजधानी आहे. गाणे फार जुनाट आहे. इतकेच, की ज्या प्रदेशात ज्या कालांत हे गाणे म्हटले जाते त्या देशांतील व कालांतील शहराचे नांव त्यात सहजच येते. मलकामपूर हे नांव मुसलमानी अंमलानंतर गाण्यांत शिरलेले आहे, हे उघड आहे.

५ गाणे चौथे : हे गाणे फार सुंदर आहे. अप्रतिम आहे. धाकुटी चंद्रावळ घराच्या अंगणात खेळत होती. तिचा पदर धाकुटया कृष्णाने धरिला. त्याचा चंद्रावळीला तिटकारा आला व तिने वैताग घेतला व ती सुतार झाली. तिने एक बाभळ तोडिली. चौरंग घडविला व त्या चौरंगावरून पारिजातकांची सुवासिक व दिखाऊ वृक्षांची फुले तोडिली व त्यांचा हार गुंफून हातग्याला वाहिला. पांच चार भाषांतील मी पुष्कळ सुंदर गाणी वाचिली आहेत. परंतु ह्या तोडीचे गाणे मला कोठे आवडले नाही. वैताग हा शब्द वित्याग शब्दाचा अपभ्रंश आहे. विशेषण त्याग वित्याग.

६ गाणे पांचवे : हे गाणे देवगिरीच्या यादवांच्या वेळचे किंवा त्याच्याहि पूर्वीचे आहे. कारण, पंढरपूर एवढेसे गांव होते असे यात म्हटले आहे. ह्यांत पंढरपूरच्या माळणीचे आपल्या नवऱ्यावरील प्रेम व कंगण्या देणाऱ्या राजाचा तिटकारा कवीने दाखविला आहे.

७ गाणे सहावे : ह्यात मामावरील प्रेम, मामीचा कंजूषपणा आणि दिरांची थट्टा केलेली आहे.

८ गाणे सातवे : ह्यात सोनचाफ्याच्या फुलांचे हार हातग्याकरिता गुंफीले आहेत.

९ गाणे आठवे : ह्यात आईचे आपल्या लहान मुलावरील वात्सल्य वर्णिले आहे.

१० गाणे नववे : ह्यात मामाच्या घराचे वर्णन आहे व धाकटया दिरावरील प्रेम दाखविले आहे. कोल्हापूराजवळील रत्नागिरीचा उल्लेख आहे. तेलंगपूर कोठले कोण जाणे ! पण ते त्या काळी लुगडयाबद्दल प्रसिद्ध पेठ असावे.

११ गाणे दहावे : यात कोथिंबिरीला उद्देशून कवन केले आहे. नामी आहे.

१२ गाणे अकरावे : यांत मुंज्या भाऊ व त्याची बहीण याचे वर्णन आहे.

१३ गाणे बारावे : यात नव्या नवरीचे सासरी जाणे वर्णिले आहे.

१४ गाणे तेरावे : यात वडील जावेची थट्टा केली आहे.

१५ गाणे चौदावे : यात नव्या नवरीचे सासरी जाणे वर्णिले आहे. कडेगांवचा उल्लेख आहे.

१६ गाणे पंधरावे :

१७ गाणे सोळावे : कोळशासारख्या काळ्या घुलोजीचे वर्णन आहे.

१८ गाणे सतरावे : हे एक उखाणे वजा गाणे आहे.

१९ गाणे अठरावे : यात सासरच्या माणसांचा विनोद आहे. सांगली देशस्थ मुली ( द ) हातग्याची गाणी हस्तनक्षत्री सुरू. दर दिवशी एक एक गाणे वाढवीत जावयाचे. सोळाव्या दिवशी सोळा गाणी.

**१ हातगा**

अयलमा पयलमा गणेश देवा
माझा खेळ मांडू दे करू तुझी सेवा
माझा खेळ मांडिला वेशीच्या दारी
पारवळ घुंमत बुरजा वरी
पारवळ फकिराचे गुंजाणे डोळे
गुंजाणे डोळ्याच्या सारविल्या टीका
आमच्या गावच्या भुलोजी नायका
एवी निंद्या तेवी निंद्या

कांडा तिळ बाई तांदूळ घ्या
आमच्या आया तुमच्या आया
खातील काय दुध उंडे
उंड्याशी लागली टाळी
औषध दे रे बा माळी
माळी गेला शेता भाता
पाऊस लागला येता जाता
पड पड पावसा थेंबा थेंबी
थेंबा थेंबी आळ्या लोंबी
आळ्या लोंबती आंखण (आंकण)
आंखणा तुझी सात कणसें
हातग्या तुझी सोळा वर्षे

१ भोंडले भावे भावे
२ तुम्हा निद्या पेवे पेवे
३ –१०–३ आमच्या आया तुमच्या आया

हा प्रारंभ कोठे कोठे करतात.

आतुला मातुला
चरणी मातुला
चरणींचे सोंडे
हातपाय खणखणीत गोंडे
एक एक गोंडा विसाचा
नेसाग नेसा पावल्यांनो
वरीस वरीस पावल्यांनो

हे चरण आणीक कोठे कोठे म्हणतात.

२

एक लिंबू झेलू बाई दोन लिंबू झेलू
दोन लिंबू झेलू बाई तीन लिंबू झेलू
तीन लिंबू झेलू बाई चार लिंबू झेलू
चार लिंबू झेलू बाई पाच लिंबू झेलू
पाच लिंब पाणवठा
माळ घाली हणमंता
हणमंताची नीळी घोडी
येता जाता कमळे तोडी
कमळा पाठीमागे होती राणी
अग अग राणी कुठं कुठं पाणी
पाणी नव्हे यमना जमना
यमना-जमनाची बारीक वाळू
तिथं खेळे तिळार बाळू
तिळार बाळाला भूक लागली
सोन्याच्या शिंपीने दूध पाजिले
नीज नीज बाळा वेल्हाळा
आम्ही जातो वरच्या माळा
वरच्या माळा जाउंगा
पाच खडे आणूंगा

एक खडा मोठा
गवरे आले पोटा
गवऱ्या तुझे ठाण ग
आता कधी येणे ग
आतां येणे चैत्रमासी
चैत्रा चैत्रा लवकर ये
हस्त घालीन हस्ताला
देव बसवीन देव्हारा
देव्हाऱ्याच्या चवकटी
उठतां बसतां लाथबुक्की

३

आड बाई आडवणी
आडाचे पाणी खारवणी
आडांत होत्या बायका
आंगी टोपी ल्हायका
आंगी टोपी हारवली
हरपा पायी दडपली
सरप म्हणे मी एकुला
दारी अंबा पिकूला

दारी आंब्याची कोय ग
आंबा नाचती मोर ग
रंभा पाही दिवट्या
आम्ही लेकी गोमट्या
गोमट काजळ लाऊंगा
सासरी माहेरी जाऊंगा
सासरी माहेरी तांब्याच्या चुली
मंडप घातला मकलामपुरी

४

धाकुटी चंद्रावळ बाई खेळती आंगणी
खेळता खेळता बाई कृष्णानी देखिली
कृष्णाने लेखिली बाई पालवा धरिली
सोड सोड पालवा मी तिकडे जाईन
तिकडे जाईन ती वैताक घेईन
वैताक घेईन मी बाबळ जे तोडीन
बाबळ जे तोडीन मी सुतार जे होईन
सुतार जे होईन मी चौरंग जे घडवीन
चौरंग जे घडवीन मी कळ्या जे तोडीन
कळ्या ज्या तोडीन मी हार जे गुंफीन
हार जे गुंफीन मी हातग्याला वाहीन

५

एवढंसं होतं पंढरपूर
एवढंसं होतं पंढरपूर
विठोबा रायाचं नगर
रखमाबाईचं सासर
विठोबा राजा दारोदारी
शंभो मोट मोट धारी
अगग भुलाई माळणी
तुला राजा बोलावितो
तुला कंगण्या घडवितो
जळो मेल्याचा कंगण्या
विकीन सोनीयाची भाजी
घेईन मोतीयाचा तेजी
माझा माळी जो बरवा
दंडी रूमाल हिरवा
दंडी रूमाल काय काय परी
हिरा झळकतो तुऱ्या परी

६

बाईच्या परसांत भेंडीचं रोप
भेंडीचं रोप खारवलं

मामाचं घर थोरवलं
मामाच्या घरी येऊं-जाऊं
तूपरोटी खाऊं-जाऊं
घाल ग मामी तुपाची धार
तुपाची धार गेली वाऱ्यानं
आई आली घोड्यानं
बाप आले घोड्यानं
बहिणी आल्या पालखीनं
भावजी आले कुत्रीनं
काहो भावजी रूसला
काळा विंचू डसला
काळा विंचू पापी
रांजणाच्या काठी
रांजण गेला गडगडत
भावजी बसले चरफडत

७

सखुबाई तुमच्या अंगणी
सुंदर चाफा लावणी
ऐसा चाफा फुलला
चला बाई कळ्या तोडाला

आम्ही बाई कळ्या तोडील्या
आम्ही बाई हार गुंफीले
हारा हारा प्रेमाळी
तिकडून आले वनमाळी
सोडा सोडा काचोळी
रात्र झाली गोकुळी

८

एवढं एवढंसं पाखरू माझं
लाल लाल की त्याची चोच
गुंजावाणी की त्याचे ग डोळे
सप्त पाताळी बाळ खेळे
की पाखरू माझं

कोण्या बाजाराशी गेलं
कोण्या नारीनं खुणाविलं
की पाखरू माझं

दह्या दुधांनी भरल्या वाट्या
वरी साखर रायपुरी
माझा जेवणारा नाना परी
की पाखरू माझं

कोण्या नारीनं खुणाविलं
दह्या दुधांनी भरविलं
की पाखरू माझं

वर साखर रायपीठी
ऊठ गोविंदा जेवायला
की पाखरू माझं

हस्तीदंतीची आणा फणी
जावळ विंचरूनी घाला वेणी
की पाखरू माझं

कोण्या नारीनं खुणाविलं
की पाखरू माझं

९

पानपुडा की शंकरचुडा की शंकरचूडा
माझा मामा की लेकुरवाळा की लेकूरवाळा
मामाच्या घरी की दुभतंच काही की दुभतंच काही
सोळा म्हशी की दोनच गाई की दोनच गाई
मामा पाहुणा आला बाई ग आला बाई
साकरउंडे की दोनच मांडे की मामी मांडे
मामासकट मामी भांडे की दोनच मांडे

मामा गेला की तेलंगपुरा की तेलंगपूरा
तेलंगपुरासनी आणली साडी ग आणली साडी
नेसून गेले मी बऱ्या पाण्या की बऱ्या पाण्या
तेथे होता ग धाकटा दीर की धाकटा दीर
उचलून घेतला मी कडेवरी की कडेवरी
चार चार चाबूक चमकाविले की चमकाविले
माझं आजोळ रत्नागिरी की रत्नागिरी
रत्नागिरीच्या टाक्यावरी की टाक्यावरी
शेला वाळतो चाप्यावरी की चाप्यावरी

१०

कोथिंबिरी बाई ग
आता कधी येशील ग
आता येईन श्रावणमासी
श्रावणा श्रावणा लवकर ये
तुला घालीन हौसरी
हौसरीचा चोळा मोळा
देव बैसले देव्हारा
देव्हाऱ्याच्या चौकट्या
उठता बसता लाथाबुक्क्या

११

आला चेंडू गेला चेंडू राया चेंडू दूधा
आलंगीची गया बाई पलंगीची गया
आपण चाले हत्ती घोडे राम चाले पायी
रामा ग वेचितो कळ्या
सीता ग गुंफिती जाळ्या
आल्या ग लगीन वेळा
दस्तुरि घातिले बहुले
आकाशी घातिला मांडव
दर्शन दर्शी ग बसल्या पंक्ती
भुलोजी राया मुंजा बाळा
मुंजा बाळाची मुंजक दोरी
तीच दोरी सावध करी
सावता सावता लागला दोर
तोच दोर सावध करी
आणा दोर बांधा चोर
बांधला चोर झाडाशी
झाड झबका फूल टपका
ते म्यां फूल तोडिले
बहिणी माथा खोविले

बहिणी तुझी वेणी ग
केतकाची फणी ग
बहिणी तुझा भांग ग
मोतीयाचा चांद ग

१२

नंणदा भावजया खेळत होत्या
खेळता खेळता झगडा झाला
भावजईवरी डाव आला
नंणद गेली समजावयाला
उठा उठा वहिनी चला घराला
सगळा खेळ देते तुमाला
मी नाही यायची तुमच्या घराला
सासुरवासी सुन रुसून बैसली कैसी
यादवराया राणी रुसून बैसली कैसी

जाऊ गेली समजावयाला
उठा उठा बाई चला घराला
ताकाचा डेरा देते तुमाला
मी नाही यायची तुमच्या घराला
सासूरवासी सून रुसून बैसली कैसी
यादवराया राणी रुसून बैसली कैसी

सासू गेली समजावयाला
उठ उठ मुली चल घराला
देवाचा देव्हारा देते तुला
मी नाही यायची तुमच्या घराला
सासूरवासी सून रुसून बैसली कैसी
यादवराया राणी रुसून बैसली कैसी

सासरा गेला समजावयाला
उठ उठ मुली चल घराला
दौत लेखणी देतो तुला
मी नाही यायची तुमच्या घराला
सासूरवासी सून रुसून बैसली कैसी
यादवराया राणी रुसून बैसली कैसी

पती गेले समजावयाला
उठ उठ राणी चल घराला
लाल चाबूक देतो तुजला
उठली ग उठली गजबजोनी
ओचा घेतला सावरोनी
पदर घेतला आवरोनी
उठ उठ राणी चल घराला
मी येते तुमच्या घराला
सासुरवाशी राणी घराशी आली कैसी
यादवराया राणी घराशी आली कैसी

१३

अवट बाई कवट ग
कवठासनं आणिला कागद् ग
तो पडला गंगेत ग
अचकुल मिचकुल भाऊ ग
वडील माझी जाऊ ग
वड्या कशा कापीती
बचक बचक वाढीती
वाढीताना देखिली
भाऊजींनी ठोकीली

१४

आरडी बाई परडी ग
परडी एवढं फूल ग
दारी मूळ कोण ग
दारी मूळ सासरा
सासऱ्यानं आणील्या पाटल्या
येत नाही बरोबर
बसत नाही घोड्यावर

आरडी बाई परडी ग
परडी एवढं फूल ग
दारी मूळ सासू
सासूनं आणल्या साखळ्या
येत नाही बरोबर
बसत नाही घोड्यावर

आरडी बाई परडी ग
परडी एवढं फूल ग
दारी मूळ दीर
दिरानं काय आणिले
दिरानी आणिले वाळे
येत नाही बरोबर
बसत नाही घोड्यावर

आरडी बाई परडी ग
परडी एवढं फूल ग
दारी मूळ नणंद
नंणदेनी काय आणलं ग बाई
नंणदेनं आणिलं गोट ग
येत नाही बरोबर
बसत नाही घोड्यावर

आरडी बाई परडी ग परडी एवढं फूल ग
दारी मूळ कोण ग
दारी मूळ पती
पतिनं काय आणिले ग बाई
पतीनं आणिली नथ
येते मी तुमच्या बरोबर
बसते तुमच्या घोड्यावर

१५

एवढासा तांदूळजा
नखांनी खुडीला
बारा जिऊ बांधिला
वेशी बाहेर टाकून दिला
गाय आली हुंगून गेली
म्हैस आली खाऊन गेली
म्हशीला झाला रेडा
गाईला झाला पाडा
तोच रेडा पाडा माझ्या बापाजीचा वाडा
बापाजीनं दिला जांभळा घोडा

जांभळ्या घोड्याची नेटकी चाल
जेथे पाऊल पडे तेथे केडगाव शहर
केडगावचे रुंद रुंद ठश्शे
ठश्शे ठश्शे अंबर घुश्शे

१६

काळा कोळसा झिक झिक राणा
पालखीत बसला घुलोजी राणा
घुलोजीची घोडी कितव्याची
नाई ग हाम्मा मोत्याची
मोती खरडून शष्कूल
शष्कूलाच्या टिका ग
टिका टिका म्हणूनी नगराशी जाता
नगरासी जाता भोजन करिता
भोजन करिता लागली काडी
काडी मोडून बांधली माडी
माडी मोडून बांधले तळे
त्या बाई तळ्यात परीट कोण धुतो
विठोबाच्या टोपीला निळा रंग देतो
रखमाबाईच्या चोळीला शाहारंग देतो

१७

भोपळीचं फूल बाई फूल वंजना
मळ्याच्या काठी मळ रंजना
माळ्यानं सांडली भीकबाळी
हुडकून दे या भूषणा
हुडकली पण गवसे ना

१८

काळी चंद्रकळा नेसू कशी
गळ्यात हार वाकू कशी
पायात पैंजण चालू कशी
बाहेर मामंजी बोलू कशी
दमडीचं तेल आणू कशी
दमडीचं तेल आणिलं
सासूबाईचं न्हाणं जाहालं
वन्संबाईची वेणी जाहाली
भाऊजींची शेंडी जाहाली
मामंजीची दाढी जाहाली
उरलं तेल झाकून ठेविलं
लांडोरीचा पाय लागला
वेशी बाहेर ओघळ गेला

त्यात रेडा वाहून गेला
सासूबाई, सासूबाई अन्याय झाला
एवढा अन्याय पोटात घाला
दूधभात जेवायला घाला

(भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे. पुस्तक नोंद क्र. ४९७, र. ८७ मधील पान ८१ ते ९३.)

• • •

# हादगा

डॉ. मधुकर वाकोडे

हस्त नक्षत्राची पूजा हादगा किंवा भोंडला या नावाने ओळखली जाते. विदर्भ—खानदेशात ज्याप्रमाणे शिव-शक्तीची पूजा बांधली जाते, त्याप्रमाणे पश्चिम महाराष्ट्रात आश्विन महिन्यात घरोघरी हादग्याची पूजा बांधली जाते.

हस्ताची पूजा म्हणजे नव्या वर्षाच्या मांगल्याची, सधनतेची, सुखा-समाधानाची पूजा. पावसाची पूजा म्हणजे ह्या गीतामागे निसर्गाच्या शक्तीची उपासना तर आहेच, खेरीज संस्कृतीचाही भाग आहे.[१] काहींच्या मते गजलक्ष्मीची कल्पना या गीताच्या मुळाशी असावी. ही नक्षत्रपूजा नसून ही पर्यायाने इंद्रपूजा असावी.[२] वस्तुतः ही मेघराजाची पूजा असून हा शुद्ध लौकिक स्वरूपाचा विधी आहे. परंपरेनुसार मेघाची पूजा ही इंद्रपूजा ठरतेच. या संदर्भात दुर्गा भागवत म्हणतात— "भोंडला हा उघड एक पर्जन्य विधी आहे. हस्त नक्षत्राशी संबद्ध असल्यामुळे हातगा हे नाव पडले. आणि 'हस्त'चा 'हत्ती'शी संबंध जोडून कौरव पांडवांची गज-गौरीची कथा त्याला जोडण्यात आली.[३]"

---

१. वनिता सारस्वत : डॉ. सरोजिनी बाबर, पृ. ८४ वे.

२. महाराष्ट्र लोकसाहित्य माला : संपा. डॉ. सरोजिनी बाबर, पृ. ५ वे व पृ. ११४ वे.

३. महाराष्ट्र जीवन—खंड दुसरा : संपा. गं. बा. सरदार, पृ. २३०-२३१.

**हस्त नक्षत्राचे कृषिव्यवस्थेतील स्थान**—भारतीय समाज कृषिमय आहे. ब्राम्हण ग्रंथात 'सर्वदेवत्या वैकृषिः', कृषि सर्व देवतामयी मानली गेली आहे. पावसाळी नक्षत्रांमध्ये हस्त महत्त्वाचे नक्षत्र म्हणूनच मानले जाते. पहिल्या चौदा देव नक्षत्रांमध्ये हस्ताचा अन्तर्भाव केला जातो. हस्ताच्या पाण्या-अभावी वांड जाण्याची शक्यता असते. 'हस्त अन् कुनबी झाला मस्त' या वाक्प्रचारावरून हस्त नक्षत्राची महती सहज लक्षात येते. लोकगीतात...

हस्त हा दुनियेचा राजा
तयासी नमस्कार माझा

अशी त्याच्या विषयी देवतुल्य भावना व्यक्त झालेली दिसून येते. डॉ. सरोजिनी बावर म्हणतात— 'रब्बीच्या हंगामातील पिके तरारून वर येत असताना त्यांना अधिकाधिक टवटवी यावी म्हणून अभ्यंगस्नान घालणाऱ्या हस्त नक्षत्राचीच ही पूजा. पावसाळ्यातील हस्त नक्षत्राचा पाऊस मोठा मानाचा. रखरखीत उन्हाने तापलेल्या धरणीला 'वर्षाने' शांत केल्यावर सर्वत्र आबादीआबाद करून सोडण्याचा त्याचा मान म्हणून हस्त नक्षत्राची पूजा बांधली जाते. 'पाटावर रांगोळीने हत्ती काढायचा आणि त्या हत्तीची पूजा बांधायची, हा या हादगा घालण्यामागचा हेतू असतो.'[१]

**हादगा म्हणजे मेघाची प्रतीकात्मक पूजा** – भारतीय संस्कृती प्रतीक-पूजक आहे. अनेक विधी, प्रथा नि लोकरूढी ह्या प्रतीकात्मकतेतून संरक्षिल्या गेल्या आहेत. ऐतरेयोपनिषदात 'परोक्षप्रिया इव हि देवाः' असे म्हटले आहे. हातग्याची पूजा ही अशीच एक सांकेतिक पूजा आहे. काळाच्या प्रवाहात पूजेमागील मेघतत्त्व मागे पडले आणि हत्ती या बाह्य गण-चिन्हाला (Totem) महत्त्व प्राप्त झाले आहे. परंतु तरीही ह्या लौकिक

१. मराठीतील स्त्रीधन : डॉ. सरोजिनी बाबर, पृ. ३३.

विधीत फारसा फरक पडला नाही; कारण भारतीय संस्कृतीत हत्ती हे मेघाचेच प्रतीक मानले गेले आहे.

हत्तीच्या अमरकोषातील चार पर्याय नामांत जलतत्त्वाचा संकेत आढळून येतो. 'ऐरावतोऽभ्रमातङ्गैरावणाभ्रमुवल्लभाः' अशी नामावळी आढळून[1] येते. ऐरावत किंवा ऐरावण ही दोन्ही संस्कृत नामे जलतत्त्वाची प्रातिनिधिक नामे आहेत. डॉ. वासुदेव शरण अग्रवाल ह्यांच्या मते तर 'इरा' म्हणजेच जल. 'इरा'चे अक्षय भांडार, त्या जलधीलाच 'इरावान्' म्हणतात. ह्या इरावन्‌मध्ये जो जन्म घेतो तोच ऐरावत.[2] अभ्रमातंग आणि अभ्रमुवल्लभ ही दोन्ही नामे तर बोलूनचालून मेघसूचकच आहेत. 'अभ्रं मेघो वारिवाहः[3]' तेव्हा मेघालाच मातंग, ऐरावत, हत्ती वगैरे संज्ञा दिलेल्या आढळून येतात, यावरून भारतीय संस्कृतीची व्यापकता आणि महत्ता सहज कळून येते.

**हादगा (हत्ती) : एक कल्पबंध –**

**हस्त घालिन हस्तारा**
**उंदीर घेतो झोपा ग**

हातग्याच्या अनेक गीतांपैकी एका गीतातील ह्या ओळी फार सूचक आहेत. भुईतून कोंब टरारून वर यावा त्याप्रमाणे हा कल्पनाबंध मनाची नाना पुटे बाजूला सारून व्यक्त झालेला आहे. हस्त, उंदीर आणि झोप या तीन्ही संज्ञा प्रतीकात्मक आहेत. ह्याच ओळींनंतर 'घरादाराची लक्ष्मी

---

१. अमरकोष : प्रथम काण्ड : पृ. १७.
२. मेघदूत एक अध्ययन : संपा. डॉ. वासुदेवशरण अग्रवाल, पृ. २६.
३. अमरकोष : दिग्वर्ग : ३, पृ. २६.

मोठी' असा चरण आढळतो. ह्या सर्वांनी मिळून एक व्यूह पूर्ण झालेला दिसून येतो. परंपरेचे फार मोठे अधिष्ठान ह्यांपैकी प्रत्येक संज्ञेला लाभले आहे.

हस्त म्हणजे हस्ती. जलरूपी गजराज. हस्ती हा जलकुंजरेंद्र आणि मतंगजेंद्र मानला गेला आहे.[१] भगवान इंद्र हा जलवर्षक तर मेघ त्याचा प्रिय मूर्तिमंत सेवक.

पर्जन्यो भगवानिन्द्रो मेघास्तस्याऽऽत्ममूर्तयः ।[२]

भारतीय परंपरेत इंद्र आणि मेघ दोघेही वर्षणशील मानले गेले आहेत. इतकेच नव्हे तर महाकवी कालीदासांनी मेघाला इंद्राचा कामरूपी मुख्य अधिकारी मानले आहे.[३] प्रजासंवर्धनाच्या दृष्टीने मेघाची वर्षणशीलता पूजाविषय होऊन बसलेली आहे. श्रीमद्भागवत महापुराणाच्या दशमस्कंधात जल हे रेतसरूप मानले गेले आहे. 'द्रव्यैस्तद्रेतसा' (श्रीमद् भागवत १० : २४ : ९) अशी जलाची महत्ता सांगितलेली आहे.

पुरुषाच्या ठिकाणी असलेले वीर्य हे जलतत्त्वच त्याला पौरुषाप्रत नेऊन पोचविते. डॉ. वासुदेव शरण अग्रवाल यांच्या मते 'प्रजासंवर्धन की दृष्टिसे मेघ के वर्षण और पुरुष के वर्षण मे न केवल भेद का अभाव है, बल्की गहरी समानता और व्यापक सम्बन्ध है।'[४]

भारतीय कृषकांनी आदिम कालापासून मेघाचे मयूरासम स्वागतच केले आहे. कृषकाने कृषित केलेल्या कर्माचे फळच मुळी मेघाधीन असते.

---

१. नागानन्दम् अंक ४, पृ. १५४ : संपा. हरिवंश लूथडा.

२. श्रीमद् भागवत महापुराण : दशमस्कंध : अ–२४.

३. जानामि त्वां प्रकृतिपुरुषं कामरूपं मघोनः पूर्वमेघ–६
मेघदूत–कालीदास.

४. मेघदूत एक अध्ययन : डॉ. वासुदेवशरण अग्रवाल, पृ. ५३.

'त्वय्यायत्तं कृषिफलमिति'[1] आणि म्हणूनच मेघ हा प्रजापती ठरतो. हस्ताला नमस्कार हा पर्यायाने मेघाला नमस्कार.

मेघरूपी ऐरावत इंद्राला प्रिय असण्याचे कारणच मुळी वर्षणशीलतेत आहे. ऐरावताला जलाविन स्वतंत्र जीवनच नाही. जलक्रीडा नि जलवर्षा हाच त्याचा स्वधर्म 'जलैराकाशगंगाया ऐरावतकरोद्धृतैः ।[2] आपल्या सोंडेतून आणलेले आकाशगंगेचे पाणी ऐरावत नारायणाच्या अभिषेकासाठीच वापरणार आणि नारायणसुद्धा जलतत्त्वाचाच प्रतिनिधी जलनिवासी.

हस्त म्हणजेच हत्ती, गजराज. 'उंदीर' ही संज्ञाच मूलतः गणेशनिर्देशक आहे. मूषक वाहन असलेला गजानन हा लम्बोदर असल्याने हत्तीप्रमाणेच सुस्त आणि मस्त. हत्ती आणि गजानन यांना एकच मतंग हे पर्यायनाम आढळून येते. हस्ताच्या कृपेने समृद्धी म्हणजे 'लक्ष्मी' प्राप्त होते. अशी ही गजलक्ष्मीची संकल्पना आपोआप ह्या गीतातून निर्माण झालेली दिसून येते.

अठराव्या शतकातील एका पहाडी शैलीतील गोवर्धनधारी ह्या चित्रात जलवर्षक मेघ न दाखविता सोंड उभारलेला आकाशात गज दाखविलेला आहे.[3] मुसळधार पावसाचे चित्रण हे प्रतीकात्मकतेने कलावंताने केलेले आहे. यातूनच भारतीय कलेची प्रतीकप्रियताही दिसून येते.

महाराष्ट्रातील मेघपूजा ही आदिमपूजा आहे. महाराष्ट्रातील 'ढगो-मेघो' संप्रदाय हा धरणीप्रमाणेच पाणदेवाची पूजा करणारा संप्रदाय आहे. 'धरणी ही आई आहे, आणि पाणी (पाणदेव : ढगोमेघो) हा बाप आहे. अशी

---

१. तत्रैव : पृष्ठ १७०.

२. श्रीमद्‌भागवत महापुराण : अ–२७, पृ. १०२.

३. ब्रजका सांस्कृतिक इतिहास : खंड १ : प्रभुदयाल मीतल, पृ. १०७ समोरील बाजू.

या भक्तांची आणि त्याच्या संप्रदायाची दृढ श्रद्धा आहे', असा निर्वाळा डॉ. रा. चिं. ढेऱ्यांनी आपल्या मातंगीपट्ट ह्या शोधनिबंधात दिलेला आहे.[१]

हातग्याच्या गीतांतील गज आणि लक्ष्मी मिळून गजलक्ष्मीची संकल्पना स्वाभाविकपणे सिद्ध होताना दिसते. या संदर्भातील डॉ. रा. चिं. ढेरे यांचे विचार अत्यंत चिंतनीय आहेत. ते म्हणतात– 'गजलक्ष्मीच्या संकल्पनेत लक्ष्मी-पद्मा, पद्मजा, पद्महस्ता लक्ष्मी ही धरती असून वर्षणशील गज हे 'द्यौ'चे प्रतिनिधी आहेत. 'आकाशाशी जडले नाते धरणीमातेचे' असा मंगल घोष घुमविणारे हे शिल्प साऱ्या सृष्टीचे रहस्य अभिव्यक्त करणारे आहे. गजलक्ष्मी संकल्पनेतील हा भाव मानवी मनाचा आद्य उन्मेष असल्यामुळे ही संकल्पना स्वाभाविकपणेच पुरातनतेचा दावा सांगू शकते.[२]

हातग्याची पूजा म्हणजे मेघाची प्रतीकात्मक पूजा. मेघांच्या गर्जनेतूनच पृथ्वीवर जलवर्षण होते आणि त्याचमुळे तिची सर्जनशीलता पूजाविषय बनते.[३] मेघालाच हत्ती कल्पून मराठी संवेदनाशील स्त्रीमनाने त्याची पूजा बांधली. एका अर्थाने ती पुरुषत्त्वाचीही पूजाच ठरते.

---

१. प्रतिष्ठान : सप्टेंबर–ऑक्टोबर १९७५ : पृ. १०.

२. तत्रैव : पृ. १७.

३. सं विद्युताः दधति वाशति त्रितः स्वरन्त्यापोऽवना परिज्रयः
ऋग्वेद ५।५४।२.



# भोंडल्या-बोंडला (हादगा) हातक्या

श्री. अनंत बाबाजी देवधर

हा खेळ आश्विन महिन्यांत हस्त नक्षत्रांत मुली खेळत असतात. हस्त नक्षत्रास ज्या दिवशी आरंभ होतो त्या दिवसापासून हा खेळ खेळण्यास सुरूवात करितात. त्या दिवसापासून हस्त नक्षत्र संपेपर्यंत हा खेळ चालून, ह्या नक्षत्राचे शेवटच्या दिवशी समाप्ति करितात. हा खेळ फक्त "वाई" "कोल्हापूर" प्रांतीच खेळतात. इतर प्रांती खेळत नाहीत. पण गुजरात प्रांतातील गर्भ्याचा प्रचारही त्याचवरून पडलेला असावा व तोहि आश्विन मासांतच गातात.

हा खेळ माजघरांत, देवघरांत किंवा घरांतील कोणत्याही आतल्या दालनांत किंवा अंगणांतहि क्वचित् खेळतात. ज्या जागेत हा खेळ खेळतात तेथील भिंतींवर मुली चित्रे काढतात व एका मोठ्या कागदावर मोठमोठे हत्ती वगैरे चित्रे काढून तो कागद त्या भिंतीस चिटकवितात व त्याजवर लाकडाची मंडपी टांगून तिजला नाना तऱ्हेची फळ-फळावळ बांधून शोभा आणितात.

हा खेळ शेजारीपाजारी मुली जमवून जिचे घर विशेष श्रीमंत असेल तिच्या येथे खेळतात. प्रत्येक मुलगी दर दिवशी डाळ, तांदूळ एकत्र करून, जिच्या घरी खेळावयाचे असेल, तिच्या घरी घेऊन जाते. सर्व मुली जमल्यावर सर्वांचे तांदूळ व डाळ एकत्र करितात व जमिनीवर एक

पाट ठेवून, त्याच्यावर ते पसरतात. नंतर त्यात एक पुरुषाचे व एक स्त्रीचे चित्र काढितात. त्यातील पुरुषाचे चित्रास "बहिलोबा" व स्त्रीचे चित्रास "बहिलोबाई" असे म्हणतात. बहिलोबाई ही बहिलोबाची स्त्री होय. नवरात्रात ज्याप्रमाणे प्रत्येक दिवशी देवाजवळ फुलांची एक माळ बांधितात, त्याप्रमाणेच ह्या वहिलोबा-बहिलोबाई देवतेजवळ कसल्यातरी फुलांची माळ अगर धान्याच्या कणसाची माळ बांधितात.

या खेळांतील देवता बहिलोबा व बहिलोबाई यांच्या नावांपासून हा खेळ धान्य समृद्धीच्या पूजनाचे द्योतक असावेसे दिसते. शिवाय हा खेळ ज्या दिवसात निरनिराळ्या प्रकारची धान्ये पिकून तयार होतात, त्याच दिवसांत खेळत असतात. त्यामुळे वरील अनुमानास वळकटी येते. बहिलोबा हा शब्द 'वहुलता' या संस्कृत शब्दाचा अपभ्रंश आहे व त्याचा अर्थ 'समृद्धी' 'विपुलता' 'आवादानी' असा आहे. हिंदुलोकांच्या धर्मशील स्वभावामुळे त्यांच्या तडाक्यातून देवत्व पावल्या वाचून कितीशा वस्तु सुटल्या आहेत, याचा विचार करितां समृद्धीस देव मानणे, हे मोठेसे असंभाव्य आहेसे दिसत नाही. तसेच शंकराने पार्वतीचे व माधवाने रमेचे पाणिग्रहण केले आहे. ही गोष्ट लक्षात आणता, बहिलोबाने बहिलोबाईचा अंगिकार केला, यात काही वावगे केले नाही, हे सहज समजण्यासारखे आहे.

**खेळण्याची रीत –** बहिलोबाची स्थापना केल्यावर सर्व मुली एकमेकींच्या हातात हात घालून पाटासभोवती वाटोळ्या उभ्या रहातात नंतर एक मुलगी गाणे सांगते व बाकीच्या मुली ते गाणे म्हणतात. गाणे सांगावयाचे म्हणजे प्रथम त्याचा एक चरण सांगावा व तो बाकीच्यांनी म्हटला की दुसरा चरण सांगावा. याप्रमाणे सर्व गाणे संपेपर्यंत सांगावे.

गाणे म्हणत असतां सर्व मुली पुढे मागे किंचित डुलत डुलत पाटा-सभोवती चक्राकार फिरत असतात.

वर सांगितल्याप्रमाणे हस्त नक्षत्राच्या शेवटच्या दिवसापर्यंत हा खेळ खेळतात. शेवटल्या दिवशी एकंदर जमलेले तांदूळ डाळ सर्वजणी घेतात व आणखीहि अवश्य ते सामान घरांतून घेऊन भातुकलीचा खेळ करितात.

भोंडल्याची गाणी अनेक आहेत. त्यापैकी काही पुढे दिली आहेत

## भोंडल्याची गाणी

१

हादुगा मातुगा तोरणी गदुगा
तोरणीच्या सोंडेवर बाळ खेळे गोंडेवर
एकेक गोंडा असावला नगर साडा नेसवला
नेसा ग नेसा माऊल्यांनो चार घरच्या पावण्यांनो
त्या गेल्या खोली सिताने टाकली डोली
चिटक्या मिटक्या कर्णफूल ते मी तोडिले
हादग्या देवा वाहिले हातग्याने ते ल्याईले
हादग्या तुझा तुर तुरा केतकिच्या मन मोहरा
बहिणी तुझी वेणी ग केतकीची ती फणी ग
निरोप देरे सोनारा हातचा बिल्ला डोलारा
सोळा लिंबे झेलीया सोळा लिमच्या तालीम ताल
माळ घातली हनुमंता
हनुमंताची निळी घोडी
येता जाता कमळे तोडी

२

आड बाई आडवणी आडाचे पाणी खारवणी
आम्ही दोघी ब्राम्हणी ब्राम्हणीचा कासोटा
गाई गेल्या वासोटा

आड बाई आडवणी आडात होती देवळी
त्यात होता गणोबा आमचा गणोबा सत्याचा
पाऊस पडला मोत्याचा

३

बाईच्या परसात भेंडीचे झाड
भेंडीचे झाड सारवले मामाचे घर थोरवले
मामाच्या घरी येऊ जाऊ तूप पोळी खाऊन जाऊ
घाल ग मामी तुपाची धार तुपाची धार गेली वाऱ्याने
आई आली चुडच्याने बाप आले घोडच्याने
बहिणी आल्या पालखीने भाऊ आले छत्रीने
भावोजी आले कुत्रीने
काहो भावोजी रुसला काळा विंचू डसला
काळा विंचू पापी रांजणाच्या पाठी
रांजण करी खडाखडा पापी लोळे गडबडा

४

नणंद भावजय खेळत होत्या
खेळता खेळता झगडा झाला
भावजईवरी डाव आला
रुसूनि बसली गाईच्या गोठ्या
सासुरवासी सुन रुसून बसली कैशी
यादवराया सून रुसूनि बसली कैशी

सासू गेली समजावयाला
उठ उठ मुली चला घराला
सारा संसार देते तुजला
मी नाही यायची तुमच्या घराला

सासरा गेला समजावयाला
उठ उठ मुली चल घराला
लाल साडी देतो तुजला
मी नाही यायची तुमच्या घराला

दीर गेला समजावयाला
उठा उठा वहिनी चला घराला
विटी दांडू देतो तुम्हाला
मी नाही यायची तुमच्या घराला

जाऊ गेली समजावयाला
उठा उठा बाई चला घराला
ताकाचा डेरा देते तुम्हाला
मी नाही यायची तुमच्या घराला

नणंद गेली समजावयाला
उठा उठा वहिनी चला घराला
सोन्याची सुपली देते तुम्हाला
मी नाही यायची तुमच्या घराला

पति गेला समजावयाला
उठ उठ राणी चल घराला
लाल चाबूक देतो तुजला
उठली ग बाई गजबजोनी
पदर घेतला सावरोनी
खोचण घेतले आवरोनी
सासुरवासी सून घरासी आली कैशी
यादवराया राणी घरासी आली कैशी

५

आरडी बाई परडी ग परडी एवढं काय ग
परडी एवढं मूळ ग दारी मूळ कोण ग

दारी मूळ सासू ग
सासुने काय आणलं ग
सासूने आणल्या साखळ्या
येत नाही बरोबर
बसत नाही घोड्यावर

याचप्रमाणे "आरडी वाई परडी ग" येथून सुरवात करुन फक्त "सासू" या शब्दा ऐवजी "सासरा" व "साखळी" या शब्दा ऐवजी "वाळे" म्हटले, की ते ह्या गाण्याचे दुसरे कडवे झाले. तसेच "दीर" व "पैंजण", "जाऊ" व "ठुशी" व "नणंद" व "सरी" हे शब्द "सासू" व "साखळी" ह्या शब्दाबद्दल म्हटले की तिसरे, चवथे व पांचवे कडवे तयार होते. सहावे कडवे पुढे लिहिल्याप्रमाणे :—

आरडी बाई परडी ग परडी एवढं काय ग
परडी एवढं मूळ ग दारी मूळ कोण ग
दारी मूळ पति ग पतीनं काय आणले ग
पतीनं आणलं मंगळसूत्र
येते तुमच्या बरोबर
बसते तुमच्या घोड्यावर

६

इथे नीज तिथे नीज कृष्णा माझ्या बाळा
मी तर जाते सोनार वाड्या

सोनार दादा की सोनार बाई
बाळाच्या साखळ्या झाल्या की नाही
फिरुनी या तुम्ही साजणी बाई

याचप्रमाणे इथे नीज तिथे नीज पासून आरंभ करून सांखळचा बद्दल वाळे पेटचा पिंपळपान वगैरे दागिन्यांची नावे घेऊन हे गाणे पाहिजे तेवढे वाढविता येते.

७

कृष्णाचे आंगडे बाई कृष्णाचे टोपडे
शिंप्या घरी बाई शिवायला टाकले
परटा घरी बाई धुवायला टाकले
चंद्रभागेत बाई खळबळीले
नागचापऱ्यावर बाई पिळीले
जाई जुईवर वाळविले
चंदन पाटावर घडी घातली
घडीचा घडरंग बाई कृष्णाचा पलंग
त्याहि रात्री जन्मले गोविंद

"सचित्र मराठी खेळांचे पुस्तक"
पान २४२ ते २४७

• • •



या या भुलाबाई आमुच्या आळी

# भुलाबाई-माहेरवाशीण

पिठोरी चांदण्यातलं दारीचं अंगण. ज़्वारीच्या ओल्या ताटांनी (धांडयांनी) तिथं उभारलेला मांडव (खोपडी). त्या मांडवातलं भुलोबा भुलाबाईंचं येणं, उठणं बसणं. नव्या वस्त्रालंकारांनी होतेला त्यांचा मानसन्मान. त्या धांदलीत पानाफुलांनी त्यांना पायघड्या घालतेल्या लहान लहान पोरीबाळींचं . . .

या या भुलाबाई आमुच्या आळी
तुमच्या अंगात लाल लाल चोळी
लाल लाल चोळीवर बैसला मोर
बैसल्या मोरावर सांडीलं अत्तर
भुलोजी मास्तर घरी नाही घरी नाही...

असलं गुणगुणनं म्हणजे वऱ्हाडातला न् खानदेशातला जगावेगळा आनंदोत्सव.

भाद्रपद अश्विनातली ही काळवेळ. या पोर्णिमेपासून त्या पोर्णिमेपर्यंत महिनाभर खेळ-गाण्यांनी होतेली ही महापूजा. भुलाईचं माहेरपण. खेळ-गाण्यांचा जल्लोष. भुलाई माहेरी आल्यामुळं तिच्याशी गुजगोष्टी करीत खेळतेल्या, नाचतेल्या न् गातेल्या मुलीबाळींनी तिचं केलेलं आगत स्वागत. स्वत:चंही भान विसरत घरी आलेल्या महादेवीला आपला सहवास घडवताना प्रकट होतेला ब्रम्हानं्द आनंदोत्सव.

म्हणून तर हसतमुखानं, प्रेमानं, एकेक पाऊल झोकात उचलीत घरी येतेल्या भुलाईला या पोरीबाळींच आवर्जून सांगणं . . .

येथून दाणा पेरीत जाऊ माळियाच्या दारी
हळूच भुलाबाई पाय टाका साखळ्या तुमच्या भारी . . .

आणि कवतिकानं तिच्यावरून आपला जीव ओवाळून टाकताना लाडीगोडीतलं म्हणणं . . .

सा बाई सूं सा बाई सूं
बेलाच्या झाडाखाली महादेवा तू
विडा रंगीला हार गुंफीला
गुलाबाचं फूल माझ्या भुलाबाईला . . .

त्या कारणानं या सुखासमाधानाला उधाण येतेलं.

घरोघरीचे कोनाडे न् दिवळ्या धुवून सारवून अगर रंगवून लख्ख लख्ख होतेल्या. त्याच्या आवती भोवती जरतारी मखराची आरास केली जातेली.

भुलाबाई म्हणजे देवी पार्वती न् भुलोबा म्हणजे शंभू महादेव, शंकर. तर त्या दोघांच्या बारकाल्या प्रतिमा म्हणून झक्कास नोक झोकातल्या भावल्या कुंभार घडवतेला. घरोघरी त्या येतेल्या. मखरातल्या पाटावर गणपतीगत त्यांची स्थापना होतेली. त्यापूर्वी त्या पाटावर गव्हातांदळाचं आसन तयार झालेलं. शेजारी पानाफुलांनी माखलेला नारळ तांब्यावर ठेवला गेलेला. पूजेतला कळस म्हणून त्याचा बोलबाला झालेला. नारळाभोवती पाच पानं खोवलेली. कळसाच्या शेजारी दोन पानं ठेवून त्यावर सुपारी ठेवलेली न् तांदळाच्या बैठकीवर पाच पैसे टाकलेले.

या कळसाची न् सुपारीची पहिली पूजा न् मगच भुलाबाईची असा रीतीरिवाज. पूजेच्यावेळी या भावल्यांना पिवळी फडकी नेसवायची हा कुळाचार. त्यांच्या भोवताली ज्वारीच्या पाच ताटांची खोपडी (मंडप) उभी करून तिथं रांगोळ्यांची सतरंजी घालायची ही चालरीत. लेकुरवाळींनी न् पोरीबाळींनी ही पूजा आवर्जून करावी हा कुळधर्म. या भुलाबाई भुलोबाच्या भोवती फेर धरून टिपऱ्या खेळत गीतं गावीत हा आनंद. त्या कारणानं या महापूजेतलं . . .

पहिली ग भुलाबाई देवा देवा साजे
घातीला मंडोबा खेळी खेळी खंडोबा
खंडोबाच्या नादीबाई वर्षा वर्षा आवषणी
आवषणीचं पाणी तसं गंगेचं पाणी

हे नमन भारी सुखावतं. ऐकण्याजोगं होतं.

रोजचं असलं गीत मग वाढत्या वयाचं लेणं लेत लांबत जातं. मधूनच गल्लोगल्लीनं झाडाला बांधलेल्या झोक्यावर मुलीबाळी झोके घेतात. तुंग्या तुंग्यानं (गटागटानं) फिरतेल्या पोरीसोरींचं घरोघरच्या भुलाईच्या पूजेला जाणं होतं. हसणं खिदळणं झाल्या कारणानं खूप मजा उडून जाते. एकमेकींशी जवळीक साधली जाऊन आयुष्यातील हा आनंद मुक्तपणानं भोगला जातो. त्यामुळं . . .

डोला बाई डोला
डोलाची कहाणी बोला
कहाणी सांगे भोळा

शंकरानं माडी बांधली
श्रीमंती श्रीमंती केली
चला चला भुलाबाई
मंदिरी जाऊ, मंदिरी जाऊ
पाटल्या नाहीत तर
कशी काय येऊ, कशी काय येऊ...

असल्या गाण्यातली गंमत आणखीनच रंगत जाते. आठवतील तेवढ्या दागिन्यांची गोळाबेरीज होत जाऊन हे गीत लांबतंच लांबतं ... आणि मग भुलाबाई हिरमुसली झालीय समजून तिलाच धीर दिला जातो.

आपे दूध तापे
त्यावर पिवळी साय
लेकी भुलाबाई
पाटल्या लेवून जाय

पण ती असते मोठी वस्ताद. म्हणते कशी ...

पाटल्यांचा जोड घेत नाही
तुमच्या बरोबर येत नाही

म्हणताना मग दागिन्यांचा नाद सोडला जातो. उणंदुणं कुणाचं कुणी काढू नये या निर्णयाला येत पोरी दुसराच विषय काढतात ...

विटी बाई विटी
सोन्याची विटी

भुलाबाईला मुलगा झाला
गावात धाडा चिठी

त्या सरशी गंभीर झालेलं वातावरण निवळतं न् मग हसण्या खिदळण्याला जोर येऊन पोरी वडवडतात . . .

भुर भुर भुरीचं जातं
पाळणा हलताना गीत ओठी येतं
नीज रे नीज रे तान्ह्या बाळा
मी तर जाते सोनारवाड्या
सोनारदादा सोनारदादा
बाळाची हसळी झाली का नाही ?....

त्यातून मग एकमेकींकडून एकमेकींना येतेल्या गीतांची देवघेव निघते. भुलाबाईच्या बाळाचं कवतिक होतं. टिपऱ्यांचा खेळणा पाळणा करून त्याच्यासाठी मग अंगाई गाईली जाते . . .

हककुंड बाळा हककुंड बाळा
आमची भुलाबाई काय करते
नाना परीच्या चोळ्या शिवते
चोळ्या शिवूनी सासरा माहेरा
परतुनी बाईजी चेंडूजी
चेंडूजी परीचा भेंडूंजी आगळा
त्याहुनी सगळी संपत्ती

संपत्ती बाळाचे लागले कपडे
भिजू घाल चोपडे जोत्यावरी
अग अग गीते
काय काय देते
परडी फुलांची परडी बेलाची
आरवण बोरवण बोरी जातीची
पाळणा हाले पाळणा हाले
पाळणा हाले दोही दोही हाती
नीज रे नीज रे तान्ह्या बाळा
मी तर जाते सोनारवाड्या

मोत्यांच्या दोरीनं झोका दिला जातेलं बाळ मग सोन्याच्या पाळण्यात निजतं . . . भुलाबाई पुन्हा या पोरींच्या बरोबर खेळायला येते. कोजागिरीला मग तिच्यासाठी जागरण साजरं होतं . . . घरात गोडधोड शिजतं. चांदण्या रात्रीला लखलखणारी आरास मांडण्यात येते आणि मग . . .

चांदण्या रात्री भुलाबाई जागवल्या जागवल्या
सासू विचारी सुनेला सुनेला
सूनबाई सूनबाई तोड्याचा जोड काय केला
सूनबाई काय केला
तुमच्या काय बापानं घडवला....घडवला....

असल्या प्रश्नोत्तरांनी सारं अंगण घुमारून जातं. सासर माहेरच्या अप्रूपाची मनसोक्त उधळण निघते. भुलाबाईच्या मनावरचा सासरघरचा जडभार

हलका केला जातो. महिन्याभराचं माहेरपण संपवून ती आता सासरी जाणार म्हणून तिच्याशी पोटभर खेळणं बोलणं होतं. आणि मग अधून मधून . . .

**आला ग आला माहेरचा वैदू**
**डोक्याला टोपी जरतारी**
**अंगात सदरा बुट्ट्येवारी**
**नेसाया धोतर जरीकाठी**
**हातात काठी चंदनाची**
**कसा ग दिसतो राजावाणी बाई राजावाणी ....**

अशा प्रकारच्या विनोदाची झालर या खेळण्या बोलण्याला लाभल्या कारणानं मनी दाटलेल्या उत्साहाला उधाण येतं . . .

खेळून माळून दमल्यानंतर फराळाची व्यवस्था केली जाते. घरोघरीच्या पोरींना सहजी ओळखू न येणाऱ्या खिरापतीबद्दलचा बोलबाला होतो.

खिरापतीसाठी घरात असेल ते न् दुकानात मिळेल ते चांगलं निदान तरी बत्तीस प्रकारांनी लक्षात घेतलं जातं. त्यातलं सगळं थोडं थोडं वान-वळ्यासाठी वापरून प्रसाद तयार होतो. दूध, हलवा, पुऱ्या, कानोले, असलं काय काय केलं असेल त्याचं वाटप होतं. भुलाबाईसह मग सगळ्याजणी चांदण्यारात्री पोटभर जेवतात. त्या नादात भुर्रदिशी एक महिना कुठल्या कुठं बघता बघता उडून जातो.

भुलाबाई मग सासरी जायला निघते. कोजागिरीच्या रात्री. माडी पौर्णिमेच्या मुहूर्तावर, त्यावेळी हार, भावल्या, पूजापत्री वगैरेची शिदोरी बांधायची न् मग तिचं एखाद्या विहिरीवर अगर नदीवर गीत गात गात जाऊन विसर्जन करायचं. अशा वेळी . . .

आडवणी की गोडवणी
दुधाखालचं धारवणी
आज भुलोजी घरी नाही
मग कथा कोणी करावी
करावी तर करावी
शंकरानंच करावी
ऐकावी तर ऐकावी
पार्वतीनंच ऐकावी
ताईजा गुपीजा
दयाजी दणकित्ता
रमाजी गडनी हौशा
बुंदीचे लाडू खौशा

महिनाभर असल्या गीतांच्या मजेदार सहवासात घालविलेले क्षण आठवून पोरींना गहिवरून येतं . . .

भुलाबाई आता सासरी जाणार या कल्पनेनंच त्यांचा जीव गलबलून जातो न् भरल्या नेत्रांना खाली बसवीत त्या कशाबशा एकमेकींच्या कुशीत शिरत आपापलीच समजूत घालावी म्हणतात. अशावेळी हुंदक्यानं दाटलेल्या या धारित्रीच्या लेकी भुलाबाई माहेरवाशिणीला उंचउंच हात करीत पालवतात न् म्हणतात कशा . . .

एवढीशी गंगा झुळझुळ वाहे
तांब्या पितळी झळकत जाय

त्यात होती बायको
हिरवी टोपी नायको
हिरवी टोपी हरपली
भुलाबाई शेला विसरली
भुलाबाई जाते सासऱ्या
जाते तशी जाऊद्या
ताम्हणभर पाण्यात न्हाउंद्या
बोटभर कुंकू लेवू द्या
चीर चोळी लेवू द्या
खीर पोळी खाऊ द्या
जांभळ्या घोडीवर बसूं द्या
जांभळ्या घोडीचे हालके पाय
आऊल पाऊल गावा जाय
आलं बऱ्हाणपूर गाव
बऱ्हाणपूरचे बारीक ठसे
माणीक मोती भुलाबाई साजे
तेल कुंकू तेलीचे साजे
उरलं सुरलं माळीण साजे
माळीया दादा, माळीया दादा
उघड ताटी लाव ताटी
नारळ लागे देठो देठी

नारळीचं मोल सांगा काय
शेवंतीचं फूल उमललं काय
शेवंतीच्या फुलावर काळी मुंगी व्याली
दुधावरली साय सांग कुणी खाल्ली
भुलाबाई गडनी साखर शेला विसरली...

पाणावलेल्या नजरेला दिसतेली समोरची वाट मग धूसर होत जाते. दिसेनाशी होते... भुलाबाईचं बोळवण करून घरी परतलेल्या सख्या साजणी मग एकमेकींचे हात एकमेकींच्या हातात गुंफीत विरंगुळा म्हणून गुणगुणतात,

या या भुलाबाई
या या आमुच्या आळी
तुमच्या अंगात लाल चोळी
बाई लाल लाल चोळी...

आणि मग असलं गीत पोटातून ओठात येत मोठ्यानं गाईलं जातं ते आपल्या मनानं विरत जातं... घरी येतेल्या पोरींचे ओठ नुसतेच हलतात न् गीताचे सूर हवेत विरून जातात... पोरी मोकळ्या हातांनी घरी आल्या की, मग खरंच त्यांना भडभडून यायला होतं... हसऱ्या खेळत्या घराच्या अंगणात पडतेली जडभारांची त्यांची पावलं जागोजाग अडखळतात ... त्यासरशी वाऱ्याच्या पाठीवर बसून गावोगाव भटकलेली भुलाबाईच्या गीतांची लकेर कुठून तरी कानावर आल्याचा भास होतो...

काळा काळा कोळसा
झिग झिग वाणा

पालखीत बसला भुलोजी राणा
घाल घाल भुलाबाई
इंजणवारा . . .

आणि मग कुठं त्यांच्या जिवात जीव येतो न् त्या आपलो कावरी बावरी नजर इकडं तिकडं भिरभिरू देत नजरेत येतेल्या पाखराजवळ निरोप देतात, "भुलाबाईला म्हणावं लवकर ये! .. लवकर ये! ... लवकर ये! .."

• • •

**संग्राहक –**

१. सौ. प्रमिला शहा, अमरावती.
२. प्रा. सौ. सिंधु मांडवकर, औरंगाबाद.
३. सौ. लीला खन्नाडे, अकोला (विदर्भ).
४. श्री. बाजीराव पाटील, चिखलगाव-अकोला.
५. सौ. रोहिणी जोशी, चंद्रपूर.
६. श्रीमती शालिनी लांडेकर, पुणे.
७. सौ. शैलजा देशपांडे, नागपूर.
८. सौ. मालती वाकोडे,
९. डॉ. विमल चोरघडे, नागपूर.
१०. डॉ. सरोजिनी बाबर, पुणे.
११. श्री. माधव नावडीकर, कोल्हापूर.
१२. प्रा. गजमल माळी, धुळे.

१ संग्राहिका
सौ. प्रमिला शहा

१

सा बाई सूं सा बाई सूं
बेलाच्या झाडाखाली महादेवा तू
विडा रंगीला हार गुंफिला
गुलाबाचं फूल माझ्या गुलाबाईला

सा बाई सूं सा बाई सूं
बेलाच्या झाडाखाली महादेवा तू
विडा रंगीला हार गुंफिला
शेवंतीचं फूल माझ्या गुलाबाईला

सा बाई सूं सा बाई सूं
बेलाच्या झाडाखाली महादेवा तू
विडा रंगीला हार गुंफिला
झेंडूचं फूल माझ्या गुलाबाईला

( हे गीत या रीतीने या गीतात कण्हेरीचे, चमेलीचे व काटेश्वरीचे फूल गुंफून असेच म्हणतात. )

२

एकच कारलं पेर ग सुने, पेर ग सुने
पेरलं ना सासूबाई
आता तरी जाऊंद्या माहेरी, माहेरी

एकच कारलं उगव ग सुने, उगव ग सुने
उगवलं ना सासूबाई
आता तरी जाऊंद्या माहेरी, माहेरी

एकच कारलं तोड ग सुने, तोड ग सुने
तोडलं ना सासूबाई
आता तरी जाऊंद्या माहेरी, माहेरी

एकच कारलं चीर ग सुने, चीर ग सुने
चिरलं ना सासूबाई
आता तरी जाऊंद्या माहेरी, माहेरी

एकच कारलं शिजव ग सुने, शिजव ग सुने
शिजवलं ना सासूबाई
आता तरी जाऊंद्या माहेरी, माहेरी

एकच कारलं वाढ ग सुने, वाढ ग सुने
वाढलं ना सासूबाई
आता तरी जाऊंद्या माहेरी, माहेरी

एकच कारलं खा ग सुने, खा ग सुने
खाल्लं ना सासूबाई
आता तरी जाऊंद्या माहेरी, माहेरी

३

आरडी एवडी परडी ग
परडी एवढं फूल ग
दारी मूळ कोण ग
दारी मूळ सासरा ग
सासऱ्यानं काय आणलं ग
सासऱ्यानं आणला साखळ्याचा जोड
घ्या घ्या गुलाबाई साखळ्याचा जोड
घेता घेता सजवली
पती आले दाराशी
एवढा शिणगार कोणाशी
गुलोजीच्या राणीशी

( हे गीत घरचे सर्व नातलग व वेगवेगळे दागिने याच रीतीने गुंफून होईपर्यंत असेच लांबते ).

४

डोला बाई डोला
डोलाची कहाणी भोळा

शंकर माडी बांधोनी श्रीमंती केली
श्रीमंती केली
चला चला गुलाबाई मंदिरात जाऊ
मंदिरात जाऊ
पाटल्या नाहीतर कशी काय येऊ
कशी काय येऊ

( हे गीत याच रीतीने सर्व दागिने गुंफून होईपर्यंत असेच लांबते ).

५

सोन्याचं फुलपात्र चांदीचं ताम्हण
तिथं आमचे मामूजी संध्या करीत होते
मामूजी मामूजी मला मूळं आलं
धाडतात का, धाडतात का
मला काय पुसते बरीच दिसते
पूस ग तुझ्या सासूला, सासूला

सोन्याचा पोळपाट चांदीचं लाटणं
तिथं आमच्या सासूबाई पोळ्या लाटीत होत्या
सासूबाई सासूबाई मला मूळं आलं
धाडतात का, धाडतात का
मला काय पुसते बरीच दिसते
पूस ग आपल्या दिराला, दिराला

सोन्याची दऊत चांदीचा टाक
तिथं आमचे भाऊजी लिहीत होते
भाऊजी भाऊजी मला मूळं आलं
धाडतात का, धाडतात का
मला काय पुसते बरीच दिसते
पूस ग तुझ्या पतीला, पतीला

सोन्याचा पलंग मखमलीची गादी
तिथं आमचे पतिराज झोपले होते
पतिराज पतिराज मला मूळं आलं
धाडतात का, धाडतात का
हातात काठी लागले पाठी
विसर ग गुलाबाई माहेरच्या गोष्टी

६

रांजणाच्या काठावरून पडला रे हरी
पडला रे हरी

साखळ्याचा जोड माझा मोडला रे हरी
मोडला रे हरी

सुरतेच्या सोनाराला बोलवा रे हरी
बोलवा रे हरी

दिवा लावून तो घडवा रे हरी
घडवा रे हरी

दिवा गेला विझून सोनार गेला खिजून

(हे गीत याच रीतीने वेगवेगळे दागिने व गावोगावचे सोनार यांची नावे घालून असेच पुढे लांबते. फक्त 'दिव्या'चे ठिकाणीं मेणबत्ती, पणती इत्यादी फरक होतात.)

७

आळ्यावरच्या पाळ्यावर धोबी धुणं धुतो
बाई धोबी धुणं धुतो
गुलाईच्या पातळाला गुलाबी रंग देतो
बाई गुलाबी रंग देतो
गुलाबी अत्तर गुलोजी मास्तर घरी नाही
बाई घरी नाही

आळ्यावरच्या पाळ्यावर धोबी धुणं धुतो
बाई धोबी धुणं धुतो
गुलाबाईच्या चोळीला हिरवा रंग देतो
बाई हिरवा रंग देतो
हिरवं अत्तर गुलोजी मास्तर घरी नाही
बाई घरी नाही

आठ्यावरच्या पाठ्यावर धोबी धुणं धुतो
बाई धोबी धुणं धुतो
गुलोजीच्या धोतराला पिवळा रंग देतो
बाई पिवळा रंग देतो
पिवळं अत्तर गुलोजी मास्तर घरी नाही
बाई घरी नाही

(या गीतात नंतर गुलोजीच्या कुडत्याला पांढरा रंग व पागोटचाला सोनेरी रंग देऊन याच रीतीने हे गाणे पुढे सरकते.)

८

घडावर घड बाई मावस घड
इथला सोनारं कारागीर
कारागीर तो कारागीर
त्यानी आणला साखळ्याचा जोड
घ्या घ्या गुलाबाई साखळ्याचा जोड
साखळ्याचा जोड घेत नाही
तुमच्या संगं येत नाही
गुलाबाई गुलाबाई घड[1] पहा
पुढल्या वर्षी बाळ घेऊन लौकर या

१. टिपऱ्यांचा घड.

९

काळा काळा कोळसा झिक झिक वाणा
पालखीत बसला गुलोजी राणा
घाल घाल गुलाबाई विंझण[1] वारा
घालता घालता वेळ लागला
आम्हाला खेळ खेळूंद्या
खेळात सापडली अधेली
अधेली देऊ वाण्याला
वाण्या वाण्या सोपा दे
सोपा माझ्या गाईला
गाई गाई दूध दे
दूध माझ्या बगळ्याला
बगळ्या बगळ्या पंख दे
पंख माझ्या राजाला
राजा राजा घोडे दे
घोडे माझ्या बापाला
बापा बापा साडी दे
साडी माझ्या आईला
आई आई चोळ्या दे

१. पंख्याचा वारा.

चोळ्या माझ्या बहिणीला
बहिणी बहिणी भातकुल दे
भातकुल माझ्या भावाला
भावा भावा गोंडे दे
गोंडा घेऊन सासरी जाईन
सासरचा ओटा
हळदकुंकू वाटा
नारळ फुटा

१०

काळा कोळसा कोरु बाई
शेर शेर तूप मावेना
गुलाबाई चौपट[1] खेळेना
चौपट खेळेना लंपट झाली
चावडीवरचा चांदोबा वाटोळा दिसे
भाग्याची गुलाबाई पातळ नेसे
पातळ नेसूंद्या पाच कळ्या सुंगूद्या[2]
सुंगता सुंगता माळी आला
एक एक कळी उडाली
गंगेत जाऊन बुडाली

१. सारीपाट. २. वास घेणे.

गंगेला आला लोंढा
भिजला माझा गोंडा
गोंड्याच्या पदरी रुपया
भाऊ माझा शिपाया
शिपायानं केली बायको
अड्यावर[1] घेऊ का कड्यावर[2] घेऊ
एवढा समींदर[3] भ्याला
त्यात होती अंबाई
नाव ठेवा भिंबाई
चल ग भिंबे पाण्याला
शंकर आले पाह्याला
शंकर आमचे जावाई
शेर शेर मोती कमाई
कमाईचे घेतले दोरे
शंकर आमचे भोळे भोळे

११

आक्कण माती चिक्कण माती असा ओटा बांधावा
अस्सा ओटा सुरेख बाई त्यावर जातं ठेवावं

---

१. खांद्यावर. २. कडेवर, कमरेवर. ३. सागरासारखा मोठा.

अस्सं जातं सुरेख बाई गहू ते दळावे
अस्सं गहू सुरेख बाई करंज्या कराव्या
अश्शा करंज्या सुरेख बाई ताटात ठेवाव्या
अस्सं ताट सुरेख बाई रुमाल झाकावा
अस्सा रुमाल सुरेख बाई पालखीत ठेवावा
अश्शी पालखी सुरेख बाई माहेरी न्यावी
अस्सं माहेर सुरेख बाई खेळाया मिळतं
अस्सं सासर द्वाड मेलं कामाला पुरतं

२ संग्राहिका
प्रा. सौ. सिंधु मांडवकर

१

एवढीशी गंगा झुळूझुळू वाहे
तांब्या पितळी झळकत जाये
तांब्या पितळी नायको
हिरवी टोपी बायको
हिरवी टोपी हरपली
सर्पाआड लपली
सरपदादा एकला
जाळी आंबा पिकला

जाई नाही जुई नाही
चिंचेखालची राणूबाई
चिंचा तोडत जाय ग
पाच पानं खाय ग
खाता खाता रंगली
तळ्यात घागर बुडाली
तळ्या तळ्या ठाकोरा
भुलाबाई जाते माहेरा
जाते तशी जाऊ द्या
तांब्याभर पाण्यांनी न्हाऊ द्या
बोटभर मेण लावू द्या
बोटभर कुंकू लावू द्या
अंगभर लुगडे नेसू द्या
हिरव्या घोड्यावर बसू द्या
हिरव्या घोड्याचे उलटे पाय
आऊल पाऊल अमरावती गाव
अमरावती गावचे ठासे ठुसे
भुलाबाई म्हणे माहेर दिसे
माझं माहेर सोनारवाडा
भुलाबाई म्हणते बिंदी वाडा

२

नदीच्या अल्याड नदीच्या पल्याड
दामाजी सोनार
त्याने घडविला साखळ्याचा जोड
घ्या घ्या भुलाबाई साखळ्यांचा जोड
कशी घेवू दादा घरी नंनद जावा
करतील माझा हेवा
हेवा परोपरी नंणदा घरोघरी
नंदाचा बैल डुलत येईल
सोन्याचं कारलं झेलत जाईल

३

आपे दूध तापे त्यावर पिवळी साय
लेकी भुलाबाई पाटल्या लेऊन जाय
एका टिपरीवर उभे राहू
माहुराचा गड पाहू
गडात गड माहूर गड
इथला सोनार कारागीर
त्याने आणला पाटल्यांचा जोड
घ्या घ्या भुलाबाई पाटल्यांचा जोड
पाटल्यांचा जोड घेत नाही
तुमच्या बरोबर येत नाही

अरडी एवढी परडी ग परडी एवढं फूल ग
दारी माणूस कोण ग
दारी माणूस सासू
सासूनी काय आणलं
सासूनी आणला कुड्यांचा जोड
घ्या घ्या सूनबाई कुड्यांचा जोड
कुड्यांचा जोड घेत नाही
तुमच्या बरोबर येत नाही

अरडी एवढी परडी ग परडी एवढं फूल ग
दारी माणूस कोण ग
दारी माणूस सासरा
सासऱ्यानी काय आणलं ग
सासऱ्यांनी आणली जोडवी
घ्या घ्या सूनबाई जोडव्याचा जोड
जोडव्याचा जोड घेत नाही
तुमच्या बरोबर येत नाही

अरडी एवढी परडी ग परडी एवढं फूल ग
दारी माणूस कोण ग
दारी माणूस नणंद
नणंदेनी काय आणलं ग

नणंदेनी आणला तोरड्याचा जोड
घ्या घ्या वहिनी तोरड्यांचा जोड
तोरड्याचा जोड घेत नाही
तुमच्या बरोबर येत नाही

अरडी एवढी परडी ग परडी एवढं फूल ग
दारी माणूस कोण ग
दारी माणूस दीर ग
दिरांनी काय आणलं ग
दिरांनी आणला चाबुक ग
घ्या घ्या वहिनी चाबकाचा मार
चाबकाचा मार खात नाही
तुमच्या बरोबर येत नाही

अरडी एवढी परडी ग परडी एवढं फूल ग
दारी माणूस कोण ग
दारी माणूस पती ग
पतीनी काय आणलं ग
पतीनी आणलं मंगळसूत्र
मंगळसूत्र मी घेते
तुमच्या बरोबर येते

४

काळा काळा कोळसा झुकझुकवाणा
पालखीत बसला भुलोजी राणा
भुलोजी राण्याचे काय काय लेणे
सरी पिंपळ एक पान
एक पान दरबारी
दुसरं पान शेजारी
शेजाऱ्याचा ढामा ढुमा
वाजतो तसा वाजू द्या
आम्हाला खेळ मांडू द्या
खेळात सापडली अधेली
अधेली देऊ वाण्याला
वाण्या वाण्या शोपा दे
शोपा माझ्या गाईला
गाई गाई दूध दे
दूध माझ्या बगळ्याला
बगळ्या बगळ्या पंख दे
पंख माझ्या राजाला
राजा राजा घोडे दे
घोडे माझ्या बापाला

बापा बापा साड्या दे
साड्या माझ्या आईला
आई आई चोळ्या दे
चोळ्या माझ्या बहिणीला
बहिणी बहिणी भातवंडी दे
भातवंडी माझ्या भावाला
भावा भावा गोंडे दे
तेच गोंडे लेऊ सासरी जाऊ
सासरच्या वाटे कुच कुच काटे
माहेरच्या वाटे हळदी कुंकू दाटे

## ३

संग्राहिका
*सौ. लीला खन्नाडे*

१

एवढीशी गंगा झुळूझुळू वाहे
तांब्या पितळी नाय ग
हिरवी टोपी हरवली
सरपा आड लपली

सरपदादा हे कोडा जाई
आंबा पिकला जाईन गे
चिंचेखालची राणोबाई
चिंचा वेचीत जाय गे
शंभर पान खाय गे
खाता खाता रंगीली
तळ्यात घागर बुडाली
तळ्या तळ्या टाकोऱ्या
भुलाबाई जाते माहेरा
जाते तशी जाऊ द्या
तांब्याभर पाण्यात न्हाऊंद्या
बोटभर कुंकू लावू द्या
तांबड्या घोड्यावर बसूंद्या
तांबड्या घोड्याचे उलटे पाय
आऊल पाऊल अकोला गाव
अकोला गावचे ठसेठुसे
दुरून भुलाबाई माहेर दिसे
आपे दूध तापे दूध त्यावर पिवळी साय
लेकी भुलाबाई साखळ्या लेवुन जाय
कशी लेवू दादा घरी नंदाजावा
करतील माझा हेवादावा

हेवा दावा नंदा घरोघरी
नंदाचा बैल डौलत येईल
एकेका टिपरीवर उभं राहू
असमानीचं घर पाहू
घरावर घर माहं (माझं) घर
एवडा शिणगार कोणाचा
भुलाबाई लेकीचा राणीचा
भुलोजीची राणी भरते पाणी
तिची सुटली मधेच वेणी
धावा धावा कोणी बांधा हिची वेणी

२

हत्तीच्या सोंडेवर पेरला मोगरा
उलीसाक[1] खुडला नगरी वास गेला
नगरी साऱ्याजणी कुशामत केली
एवड्या रातरी धुणं कोण धुई
धूग धूग बाई गाजर गोड्या
वाळू घाल ग जाई मोगऱ्यावरी
घडी कर ग चंदन पाटावरी
नेऊन ठेव ग राधिकेच्या घरी

१. थोडासा, एवढासा.

३

नदीच्या पलीकडं राळा पेरला बाई राळा पेरला
एके दिवशी काऊ आला बाई काऊ आला
एकच दाणा तोडुन नेला बाई तोडुन नेला
सईच्या अंगणी टाकुन दिला बाई टाकुन दिला
सईन उचलूनी घरात नेला बाई घरात नेला
कांडुन कुटुनी राळा केला बाई राळा केला
राळा घेऊनी बाजारात गेली
पाच पैशाची घागर आणली
घागर घेऊन पाण्याला गेली
मधल्या बोटाला विंचू चावला
आला ग बाई सासरचा वैद्य
डोक्याला टोपी फाटकी तुटकी
अंगात सदरा फाटका तुटका
पायात बांधल्या चिंध्या
हातात काठी जळकं लाकूड
आला ग माहेरचा वैद्य
डोक्याला टोपी जरीकाठी
अंगात सदरा मखमली
पायात बूट बुट्टेदार

हातात काठी पंचरंगी
तोंडात विडा केशरी

४ संग्राहक
श्री. बाजीराव पाटील

१

चाल चाल भुलाबाई न्हायाले
केसरे गोंडे लेयाले
केसर गोंडे काजाचे
आमचे भाऊ राजाचे
कळीस[१] घीऊ का खांदी घीऊ
समुद्राच्या काठी जाऊ
असा समुद्र मेला
फुलं येचत गेला
फुलात होती अंबाई
नाव ठेवा भिमाई
भिमाईच्या सुपल्या
ठायी ठायी गुंफल्या

१. कडेवर.

एक सुपली हारपली
डाया[1] घरी सापडली
डाया घरचा चोरमाय
खिळकी आंबा फोळमाय
खिळकी आंबा फुटेना
दारचा पाव्हना उठेना
दारचा पाव्हना उठला
भितीले जाऊन खेटला
भितीले होता इचू[2]
अन् खाय कुचू कुचू

२

अळकीत जाऊ का खिळकीत जाऊ
खिळकीत होता दाना
भुलोजीला मुलगा झाला नाव ठेवा नाना

अळकीत जाऊ का खिळकीत जाऊ
खिळकीत होती सुई
भुलोजीला मुलगी झाली नाव ठेवा सई

---

१. डाव्या. २. विंचू.

अळकीत जाऊ का खिळकीत जाऊ
खिळकीत होता बदामा
भुलोजीला मुलगा झाला नाव ठेवा सुदामा

अळकीत जाऊ का खिळकीत जाऊ
खिळकीत होत्या खारका
भुलोजीला मुलगी झाली नाव ठेवा द्वारका

अळकीत जाऊ का खिळकीत जाऊ
खिळकीत होता गिलास
भुलोजीला मुलगा झाला नाव ठेवा विलास

अळकीत जाऊ का खिळकीत जाऊ
खिळकीत होती टिपरी
भुलोजीला मुलगी झाली नाव ठेवा झिपरी

अळकीत जाऊ का खिळकीत जाऊ
खिळकीत होती बशी
भुलोजीला मुलगी झाली नाव ठेवा काशी

अळकीत जाऊ का खिळकीत जाऊ
खिळकीत होता झोपाळा
भुलोजीला मुलगा झाला नाव ठेवा गोपाळा

अळकीत जाऊ का खिळकीत जाऊ
खिळकीत होत्या बिट्ट्या
भुलोजीला मुलगा झाला गावोगाव चिठ्ठ्या

अळकीत जाऊ का खिळकीत जाऊ
खिळकीत होता पाटा
भुलोजीला मुलगा झाला साखरपान वाटा

विहीर बाई विहीर अशी कशी विहीर
सोन्याच्या पायऱ्या रूप्याचा दोर

आज भुलाबाई घरी नाई कथा कोणी करावी
करावी तर करावी शंकरानं करावी
पारबतीनं ऐकावी

बाना बाई बाना साखरेचा बाना
आमचं गानं संपलं, खिरापत आना

३

काळी चिमनी निळी चिमनी बसली बाभुयबनात
दोनशाची नथनी आमुच्या भुलाबाईच्या नाकात

काळी चिमनी निळी चिमनी बसली बाभुयबनात
दोनशाच्या दंडवाक्या आमुच्या भुलाबाईच्या दंडात

काळी चिमनी निळी चिमनी बसली बाभुयबनात
दोनशेची करनफूल[1] आमुच्या भुलाबाईच्या कानात

( वरील प्रमाणेच एका एका दागिन्याचे नाव घेत असेच हे गाणे म्हटले जाते. )

४

काय म्हनतं बाई बाई व
माह्या चिमन्या काहुन टांगल्या रे
माहा गहू खाल्ला खाल्ला व
मेल्याचा गहू वळाची कंठी पिलाची दंटी
रंग चिवू चिवू
पानी कोन पाजील रंग चिवू चिवू
चारा कोन टाकील रंग चिवू चिवू

काय म्हनतं बाई बाई व
माह्या चिमन्या काहून टांगल्या रे
माहा तांदुय खाल्ला खाल्ला
मेल्याची तांदुय वळाची कंठी पिलाची दंडी
रंग चिवू चिवू

---

१. कर्णफूल.

पानी कोन पाजील रंग चिवू चिवू
चारा कोन टाकील रंग चिवू चिवू

( या प्रमाणे वेगवेगळ्या धान्याची नावे घेत हे गाणे पुढे लांबवले जाते. )

५

वैनी पेवं घ्या पेवं
वैनी कशाचे पेवं
वैनी तुरीचे पेवं
तुरीचे पेवं पाह्यजत नाई
दाल्याचे[1] घरी जातई नाई
दाल्याचे घरी दाना ना दुना
लेक झाली बाई चवरगोंडा

वैनी पेवं घ्या पेवं
वैनी कशाचे पेवं
वैनी लाखाचे पेवं
लाखाचे पेवं पाह्यजत नाई
दाल्याचे घरी जातई नाई

---

१. नवऱ्याचे.

दाल्ल्याचे घरी दाना न दुना
लेक झाली बाई चवरगोंडा

( या प्रमाणे निरनिराळ्या धान्याचा उल्लेख करीत हे गाणे असेच वाढत जाते. )

६

माळी भोळानी आला सनं
फुंडके[1] करा दोन तीन
दीर म्हनतो आनखीन घेनं
सासूबाई म्हनते ठेव झाकून
माळी भोळानी आला सनं
फुंडके करा दोन तीन
जाऊ म्हणते आणखीन द्येनं
सासूबाई म्हनते ठेव झाकून

७

हेल्या[2] हेल्याची झुंबळ झाली बाई झुंबळ झाली
त्यात माही किली हारपली बाई हारपली

---

१. एक खाद्यपदार्थ. २. रेडा.

माझ्या सासूले कळू गेलं
माहा माहेर जबलपूर
जबलपूरचा देशपांड्या
गहू झाले सहा खंड्या
सहा खंड्याच्या मनभर पाट्या
एक पाटी कायतरी झाली बाई कायतरी झाली
माझ्या मामानं किंगरी देली बाई किंगरी देली
किंगरीचा दोरा तुटं
माझ्या फुगळीले वारा सुटं

५ संग्राहिका
*सौ. रोहिणी जोशी*

१

आम्ही बाई बेलाच्या बेलकरणी
तो बाई गजाचा मूळ
तो बाई बसला दुकानी
मारीत सुपारी फेकूनी
सई गेली रडत
काय करतील तिचे माय बाप

"खन" वाळा फिरतो
जीव माझा ढवळितो

२

आम्ही नवरी पाहून येतो ग
तुम्हा नवरी कोण कोण साजे ग
आम्ही नवरी साजे ग
सोनं देऊ वान देऊ
खंडीभर गाई देऊ
गोठाभर म्हशी देऊ
तीळगूळ खाय वो
भुलाई सासुऱ्या जाय वो

३

खेळून माळून आल्या मुली
"मुखरीन"[1]च्या मायनं आरती केली
आरती केली मानाची
चोळी शिवली खणाची
आमची मुखरीण नेसली "वाला"
घामानं तो झाला वला (ओला)

---

१. जिच्या घरी गौर मांडण्यात येते ती.

आमची मुखरीण बरवी
भात मांडे चरवी
वरण करे तपेला
नवरा आला भुकेला
जेवु घाले ताटी
विडा देई हाती

४

पिकली पिकली कारुली
सख्या वेला गेली
बया वागत वनात
गेली बाई धावत
गावचा नानाजी सोनार
त्याने घडवले घडवले
बुगड्याचे जोड
आमची भुलाई लेणार लेणार
मांडवी ये भ्रतार

६ संग्राहिका
*श्रीमती शालिनी लांडेकर*

१

भुलाबाई लेकी
सोनीयाच्या वाकी
बाजुबंद टेकी जवाडाच्या, जवाडाच्या
भाऊ भाऊ टेकती माथा पूजुन धरती
धरती ते एकच पान दुरुन भुलाबाई नमस्कार नमस्कार
पहिली ग पूजू बाई देवा देवा साथ दे
द्या तिला मंडोबा केळी केळी
खंडोबा खंडोबाच्या नारी बाई वरचं वरचं अवसणी
अवसणीचं पाणी कसं गंगेचं पाणी
गंगेच्या पाण्याने वेळीला भात
जेविला कंथ ठाकीला राळा हनुमंत बाळा
हनुमंत बाळाचे लांब लांब सोगे
हातपाय कोवळे भुलाबाईचे, भुलाबाईचे

२

माडीच्या खाली बाई मोगरा पेरीला
जरासा खुडिला बाई वास नगरी गेला

नगराच्या राजानी बाई खुशामत केली
नेणंती गौराबाई माडीवर नेली
माडीचे खालयानी बाई कंचनीचे देठ
एवढ्या रात्री बाई धुणं कोण धुतं
पुरविले हेत बाई शंकरानी
चांदण्या रात्री भुलाबाई जागवल्या, जागवल्या

सासू पुसते सुने सुने
साखळ्यांचा जोड तो काय केला, काय केला
हरवला हरवला, तुमचं काय जातं
माझ्या बापानी घडवला, घडवला
चांदण्या रात्री भुलाबाई जागवल्या, जागवल्या

सासरा पुसतो सूनबाई सूनबाई
साखळ्यांचा जोड तो काय केला, काय केला
हरवला हरवला तुमचं काय जातं
माझ्या बापांनी घडवला घडवला
चांदण्या रात्री भुलाबाई जागवल्या, जागवल्या

भासरा पुसतो वैनी वैनी
साखळ्यांचा जोड तो काय केला, काय केला
हरवला हरवला तुमचं काय जातं
माझ्या बापानी घडवला घडवला
चांदण्या रात्री भुलाबाई जागवल्या, जागवल्या

जाऊ जाते पुसावयाला
साखळ्यांचा जोड तो काय केला, काय केला
हरवला हरवला तुमचं काय जातं
माझ्या बापानी घडवला घडवला
चांदण्या रात्री भुलाबाई जागवल्या, जागवल्या

दीर जातो पुसावयाला
साखळ्याचा जोड तो काय केला, काय केला
हरवला हरवला तुमचं काय जातं
माझ्या बापानी घडवला घडवला
चांदण्या रात्री भुलाबाई जागवल्या, जागवल्या

नणंद जाते पुसावयाला
साखळ्यांचा जोड तो काय केला, काय केला
हरवला हरवला तुमचं काय जातं
माझ्या बापानीच घडवला घडवला

३

एक लिंबू झेलू बाई दोन लिंबू झेलू
दोन लिंबू झेलू बाई तीन लिंबू झेलू
तीन लिंब झेलू बाई चार लिंब झेलू
चार लिंब झेलू बाई पाच लिंब झेलू
पाच लिंब झेलू बाई सहा लिंब झेलू

सहाव्या लिंबाचा कानोळा
गौराई राणीचे डोहाळे
तिचे डोहाळे तिला भारी
नेऊन टाका पलंगावरी
पलंग फिरे चौक फिरे
शंकर बसले भवरी

पहिल्या मासीचा गरवा
कधी येशील सरवा
सरता सरता आंब्यावरी
चंदन गडाच्या महालावरी
आंबे बहुत कवळे
गौरी राणीचे डोहाळे
तिचे डोहाळे तिला भारी
नेऊन टाका पलंगावरी
पलंग फिरे चौक फिरे
शंकर बसले भवरी

दुसऱ्या मासीचा गारवा
कधी येशील सरवा
सरता सरता संत्रावरी
चंदन गडाच्या महालावरी

संत्रे बहुत कोवळे
गौराई राणीचे डोहाळे
तिचे डोहाळे तिला भारी
नेऊन टाका पलंगावरी
पलंग फिरे चौक फिरे
शंकर बैसले भवरी

तिसऱ्या मासीचा गरवा . . .

(याप्रमाणेच नऊ महिन्याचे नाव घेऊन व प्रत्येक फळाचे नाव असेच गुंफून हे गीत म्हणायचे.)

४

वाजंत्रीच्या गोण्या बाई लोटविल्या अंगणी

भुलाबाई बाळंतीण पहिला दिवस
पहिला दिवस साखरेच्या गोण्या बाई लोटविल्या अंगणी

भुलाबाई बाळंतीण दुसरा दिवस
दुसरा दिवस खारकेच्या गोण्या बाई लोटविल्या अंगणी

भुलाबाई बाळंतीण तिसरा दिवस
तिसरा दिवस नारळाच्या गोण्या बाई लोटविल्या अंगणी

भुलाबाई बाळंतीण चौथा दिवस
चौथा दिवस बदामाच्या गोण्या बाई लोटविल्या अंगणी

भुलाबाई बाळंतीण पाचवा दिवस
पाचवा दिवस सुपारीच्या गोण्या बाई लोटविल्या अंगणी

भुलाबाई बाळंतीण सहावा दिवस
सहावा दिवस लवंगाच्या गोण्या बाई लोटविल्या अंगणी

भुलाबाई बाळंतीण सातवा दिवस
सातवा दिवस अक्रोडाच्या गोण्या बाई लोटविल्या अंगणी

भुलाबाई बाळंतीण आठवा दिवस
आठवा दिवस केशराच्या गोण्या बाई लोटविल्या अंगणी

भुलाबाई बाळंतीण नववा दिवस
नववा दिवस गुळाच्या गोण्या बाई लोटविल्या अंगणी

भुलाबाई बाळंतीण दहावा दिवस
दहावा दिवस हळदीच्या गोण्या बाई लोटविल्या अंगणी

भुलाबाई बाळंतीण अकरावा दिवस
अकराव्या दिवशी शुद्ध झाली

बाराव्या दिवशी बारसे केले
झेंडोजी म्हणून नाव ठेविले

५

खण खण कुदळी मण मण माती
देऊळ खचलं चांदण्या रात्री

चांदण्या रात्री माणिक मोती
आम्ही दिले गौराई हाती
गौराई गौराई उभी रहा
तिथून आपलं माहेर पहा
माहेर काही दिसेना
शंकराला पुसेना
शंकराला पुसलं
गौराईचं माहेर दिसलं

७ संग्राहिका
*सौ. शैलजा देशपांडे*

१

कारल्याची बी पेर ग सुने, पेर ग सुने
मग जा आपुल्या माहेरा माहेरा

कारल्याची बी पेरली हो सासुबाई
आता तरी धाडा माहेरा

कारल्याचे रोप येऊ दे ग सुनबाई
मग जा आपल्या माहेरा माहेरा

कारल्याचे रोप आले हो सासूबाई
आता तरी धाडा माहेरा माहेरा

कारल्याचा वेल वाढू दे ग सुनबाई
मग जा आपुल्या माहेरा माहेरा

कारल्याचा वेल वाढला हो सासुबाई
आता तरी धाडा माहेरा माहेरा

कारल्याला कारली येऊ दे ग सुनबाई
मग जा आपुल्या माहेरा माहेरा

कारल्याला कारली आली हो सासूबाई
आता तरी धाडा माहेरा माहेरा

कारल्याची भाजी कर ग सुनबाई
मग जा आपुल्या माहेरा माहेरा

कारल्याची भाजी केली हो सासूबाई
आता तरी धाडा माहेरा माहेरा

भाजीचे भांडे घास ग सुनबाई
मग जा आपुल्या माहेरा माहेरा

भाजीचे भांडे घासले हो सासुबाई
आता तरी धाडा माहेरा माहेरा

मला काय पुसते बरीच दिसते
पुस जा आपुल्या सासऱ्याला सासऱ्याला

२

सोन्याची दौत मोत्याचा टाक
तेथे आमचे मामंजी लिहीत होते
मामंजी मामंजी मला आले मूळ
मला काय पुसते बरीच दिसते
पुस जा अपुल्या दिराला दिराला

सोन्याची विटी चांदीचा दांडू
तेथे आमचे भावजी खेळत होते
भाऊजी भाऊजी मला आले मूळ
मला काय पुसता बऱ्याच दिसता
पुसाजा आपुल्या नणंदेला नणंदेला

सोन्याचा डेरा बाई मोत्याचा रवी
तेथे आमच्या वन्सं ताक करीत होत्या
वन्सं वन्सं मला आले मूळ
मला काय पुसता बऱ्याच दिसता
पुसाजा आपल्या पतीला पतीला

चांदीचा पलंग मोत्याची मच्छरदाणी
तेथे आमचे पतीराज झोपले होते
पतीराज पतीराज मला आले मूळ
आणा फणी घाला वेणी
गेल्या सुनबाई माहेरा माहेरा

८ संग्राहिका
सौ. मालती वाकोडे

१

अती पडला थेंब तती पडला थेंब
उगयली काडी
भोळा शंकर बांधिल माडी
बांधिता बांधिता श्रीमंत झाला
चला भुलाबाई जागरनाला
पाटल्या नाहीत कशी मी येवू
पाटल्याईसाठी वंजीले गेले
वंजीचं कारलं झेलत आले

(या नंतर वेगवेगळ्या दागिन्यांचा असाच उल्लेख येतो.)

२

उलसाक पापड भाजीला
चुली मागे ठेवला
सासुबाईनी पायला
सासुने केला गलबला
कागद धाडा माहेरा

कागदावर आले बाबाजी
रुमझुम गाडी जुतली
त्यातं भुलजी बसली
का ग भुलजी कुठं चालली
बाबाजीची याद आली

३

आमच्या अंगणी मेंडीचं झाडं
ओ.... ओ.... झेलल
भुलाबाईचे मामा येतील
फुल् फुल् साड्या आनतील ग
फुल् फुल् साड्या नेसून घ्या
लांब लांब पदर काढून घ्या
लांब लांब पदर भरजरी
भुलाबाईचे मामा व्यापारी
तोंडात चिक्कन सुपारी
सुपारी काही फुटेना
मामा काही उठेना
सुपारी गेली फुटून
मामा गेले उठून

४

लिंब घ्या लिंब
कनीक मळली
मैना रूसली
जावून बसली
तोरड्या आनल्या
ठेवल्या तबकात
घाल ग राणी घाल ग
तुला गळ्याची शप्पत

(या पुढे या गीतात अंगठी—एकदानी—कंगणी वगैरे दागिन्यांचा असाच येतो.)

५

भुलजी बाई भुलजी
भुलजी बसली न्हायाले
शंकर आले पायाले
असे शंकर मेले
कळया वेचत गेले
कळ्यात होती अंबूबाई
नाव ठेवलं गिरजाबाई

अंबाडीच्या सुपल्या
ठायी ठायी गुंफल्या
एक सुपली हारपली
मामा घरी लपली
मामा मामा चोर ग
जिभीले आला फोळ ग
जिभीचा फोळ फुटेना
दारचा मामा उठेना
जिभीचा फोळ फुटला
दारचा मामा उठला

६

डुलं बाई डुलं डुल्याची काडी
भोळा शंकर बांधिल माडी
माडी बांधून मंदिर केले
चला चला भुलाबाई मंदिराले
पाटल्या नाहीत कशी मी येवू
डुल बाई डुलं डुल्याची काडी

( सर्व चरण यापुढे असे सारखेच, फक्त अलंकार बदलतात. )

७

चल ग सीते जागरणाला
जागता जागता आली डुलकी
सीता झाली कानोडी
मागे परडी बेलाची
पुढे परडी फुलाची
हाती फणी दंताची
शेंडी विचरे कंताची
सीताबाई रामाची
पार्वती शंकराची

आड बाई आड ग इतका कसा खोल ग
सोनियाच्या पायऱ्या रूपयाचा जोड ग
आज भुलाबाई घरी नाही
कथा कोणी करावी
करावीत करावी शंकराने करावी
ऐकावीत ऐकावी पार्वतीने ऐकावी

१ संग्राहिका
*डॉ. विमल चोरघडे*

१

आपे दूध तापे त्यावर पिवळी साय
लेकी भुलाबाई तोंडे लेवून जाय
कशी लेवू दादा घरी नणंदा जावा
करतील माझा हेवा
हेवा परोपरी नणंदा घरोघरी
दुःख देती भारी
नणंदेचा बैल डुलत येईल
सोन्याचं कारलं झेलत येईल
एका टिपरी उभे राहू अस्मानीचा गड पाहू
गडावर गड माहूरगड तिथचा सोनार कारागीर
त्यानं आणला साखळजोड
घेता घेता लाजली तळ्यात घागर बुडाली
तळ्या तळ्या ठाकुरा भुलाबाई जाते सासूरा
जाते तशी जाऊ द्या तांब्याभर पाण्यानं न्हाऊ द्या
बोटभर मेण लावू द्या कपाळाभर कुंकू लेऊ द्या
जांभळे लुगडे नेसू द्या जांभळी चोळी घालू द्या
मूठभर भात खाऊ द्या जांभळ्या घोड्यावर बसू द्या

जांभळ्या घोड्याचे उडते पाव आऊल पाऊल नागपूर गाव
नागपूर गावचे ठासेठुसे दुरून भुलाबाईचे सासर दिसे

२

येवढीशी गंगा झुळू झुळू वाहे
तांब्या पितळी झळकत जाय
तांब्या पितळी नाय ग
हिरवी टोपी घाल ग
हिरवी टोपी हरवली
सर्पाआड लपवली
सरपदादा हेकोडा
जाई आंबा तेकोडा
जाई आंबा पिकला
भुलाबाईला वाहिला
जाई नव्हे जुई नव्हे
चिंचेखालची राणूबाई
चिंचा तोडित जाय ग
नारळ तोडित जाय ग
घोड्यावरचा भुलोजी राणा
पालखीतली राणूबाई
चिंचा तोडित जाय ग

शंभर पानं खाय ग
खाता खाता रंगली
तळ्यात घागर बुडाली

१० संग्राहिका
*डॉ. सरोजिनी बाबर*

१

कारलीचं बी पेर ग सूनबाई
मग जा आपल्या माहेरा

कारल्याचं बी पेरलं हो सासूबाई
आता तरी धाडाना माहेरा

कारल्याला पाणी घाल ग सूनबाई
मग जा आपल्या माहेरा माहेरा

कारल्याला पाणी घातलं हो सासूबाई
आता तरी धाडाना माहेरा

कारल्याला मोड येऊ दे ग सूनबाई
मग जा आपल्या माहेरा माहेरा

कारल्याला मोड आला हो सासूबाई
आता तरी धाडाना माहेरा

कारल्याला मांडव घाल ग सूनबाई
मग जा आपल्या माहेरा माहेरा

कारल्याला मांडव घातला हो सासूबाई
आता तरी धाडाना माहेरा

कारल्याला फूल येऊ दे ग सूनबाई
मग जा आपल्या माहेरा माहेरा

कारल्याला फूल आलं हो सासूबाई
आता तरी धाडाना माहेरा

कारल्याला कारलं लागू दे ग सूनबाई
मग जा आपल्या माहेरा माहेरा

कारल्याला कारलं लागलं हो सासूबाई
आता तरी धाडाना माहेरा

कारल्याची भाजी कर ग सूनबाई
मग जा आपल्या माहेरा माहेरा

कारल्याची भाजी केली हो सासूबाई
आता तरी धाडाना माहेरा

भाजीचा गंज घास हो सूनबाई
मग जा आपल्या माहेरा माहेरा

भाजीचा गंज घासला हो सासूबाई
आता तरी धाडाना माहेरा

मला काय पुसतेस पुस जा आपल्या सासऱ्याला
मामाजी मामाजी आता तरी माहेरी धाडाना

मला काय पुसतेस पुसजा आपल्या दिराला
भाऊजी भाऊजी आता तरी माहेरी धाडाना

मला काय पुसतेस पुसजा आपल्या जावेला
जाऊबाई जाऊबाई आता तरी माहेरी धाडाना

मला काय पुसतेस पुसजा आपल्या नणंदेला
वन्सं वन्सं आता तरी माहेरी धाडाना

मला काय पुसतेस पुसजा आपल्या नवऱ्याला
पतिराज पतिराज आता मला माहेरी धाडाना

घेतली काठी लागली पाठी
जाऊन बसली नदीच्या काठी

२

या भुलाबाई आमुच्या आळी
तुमच्या अंगात निळ्ळी चोळी
निळ्या चोळीवर मोर काढला
निळ्ळ्या मोरावर सांडला गुलाल
भुलोजी दल्लाल घरी नाही, घरी नाही

या भुलाबाई आमुच्या आळी
तुमच्या अंगात लाललाल चोळी
लाल लाल चोळीवर बसला मोर
बसल्या मोरावर सांडलं अत्तर
भुलोजी दातार घरी नाही, घरी नाही

या भुलाबाई आमुच्या आळी
तुमच्या अंगात पारवी चोळी
पारव्या चोळीवर चितारला मोर
चितारल्या मोरावर सांडलं पाणी
भुलोजी वाणी घरी नाही, घरी नाही

३

येथून दाणा पेरीत जाऊ माळीयाच्या दारी
हळूच भुलाबाई पाय टाका साखळ्या तुमच्या भारी

येथून दाणा पेरीत जाऊ माळीयाच्या दारी
हळूच भुलाबाई पाय टाका तोरड्या तुमच्या भारी

येथून दाणा पेरीत जाऊ माळीयाच्या दारी
हळूच भुलाबाई पाय टाका तोडे तुमचे भारी

४

अलीकडे दवण्याची काडी
पलीकडे दवण्याची काडी
मधी गवळ्याची माडी
ऱ्हाई बाई ग

गवळ्याला दोन मुलं
त्यांची नावं काय बाई
राघू आणि मैना सई
ऱ्हाई बाई ग

राघू बोलला आईला
पंचमीच्या सणायाला
आणू काय ग भुलाईला
ऱ्हाई बाई ग

आला मैनाचा भाऊ
कावो पावणं येणं केलं
मैनाईला मूळ आलं
न्हाई बाई ग

पाठवावी मैनाईला
भुलाबाई लाडाईला
पाठवावी बाळाईला
न्हाई बाई ग

अग अग पोरीसोरी
मला काय पुसतीस
पुस जा आपल्या सासूला
न्हाई बाई ग

सासू आत्याबाई ऐकावं जी
पाठवावी मला माहेराला
एवढी विनंती तुम्हाला
न्हाई बाई ग

अग अग सूनबाई
मला काय ग पुसतीस
पुस जा आपल्या सासऱ्याला
न्हाई बाई ग

मामंजी मामंजी ऐकावं जी
पाठवावी मला माहेराला
एवढी विनंती तुम्हाला
ऱ्हाई बाई ग

मला काय ग पुसतीस
सून सासुरवाशी तू ग
पुस जा आपल्या पतीला
ऱ्हाई बाई ग

ऐकावं जी घरधनी
मूळ आलं माहेराचं
पाठवावी मला माहेराला
ऱ्हाई बाई ग

आवो पावणं
पाठवावी माहेराला
भुलाबाई मैनाईला
ऱ्हाई बाई ग

अवो अवो पावणं
न्यावी तुमच्या मैनाईला
भुलाबाई हरकली
भावासंगं माहेरा गेली

दीड दिवसाची बोली झाली
न्हाई बाई ग

## ११

संग्राहक
श्री. माधव नावडीकर

१

गडावर गड बाई म्हावरगड
तिथला सोनार कारागीर
त्याने आणला साखळजोड
घ्या घ्या भुलाबाई साखळजोड
साखळ्याचा जोड घेत नाही
तुमच्याबरोबर येत न्हाई

गडावर गड कैलासगड
तिथला सोनार कारागीर
त्याने आणले दागिने
भुलाबाई बोले रागाने
साखळ्या वाळे तोरड्या
या तर पायी बेड्या

गोट पाटल्या तोडे
हाती बसती वेढे
बाकी बाजूबंद दंडी दोरखंड
सरी ठुशी हार झाला गळ्या भार
बाळ्या बुगड्या नथेला
भोके नाका कानाला
असले दागिने घेत न्हाई
तुमच्याबरोबर येत न्हाई

साध्या भोळ्या पार्वतीला
आणू फूले पूजेला
मनोमनी प्रेम ठेवू तिचे काही गुण घेऊ
तेच दागिने मोलाचे भुलाबाईच्या तोलाचे

२

सईच्या अंगणात राळा पेरला बाई राळा पेरला
एके दिवशी काऊ आला बाई काऊ आला
एकच कणीस तोडून नेलं बाई तोडून नेलं
सईच्या अंगणात टाकून दिलं बाई टाकून दिलं
सईनं उचलून घरात नेलं बाई घरात नेलं
कांडून कुटून राळा केला बाई राळा केला

घागर घेऊन पाण्याला गेली बाई पाण्याला गेली
मधल्या बोटाला विंचू चावला बाई विंचू चावला

## १२

संग्राहक
*प्रा. गजमल माळी*

१

काळा कोळसा झिक झिक वाणा
पालखीत बसला भुलोजी राणा
घाल घाल बुलोजी इंजीन वारा
घालता घालता लागला वेळ
घरात रडतं तान्हं बाळ
तान्ह्या बाळाचं काय काय लेणं
सरी पिंपळ एकच पान
एक पान दरबारी
दरबाराचा डामा डौल
वाजतो तसा वाजू द्या
आम्हाले खेळ मांडू द्या
खेळात सापडली अधेली
अधेली देऊ वाण्याला

वाण्या वाण्या शोप दे
शोपा माझ्या गाईला
गाई गाई दूध दे
दूध माझ्या बगळ्याला
बगळ्या बगळ्या पंख दे
पंख माझ्या राजाला
राजा राजा घोडे दे
घोडे माझ्या बापाला
बापा बापा साड्या दे
साड्या माझ्या आईला
आई आई चोळ्या शीव
चोळ्या माझ्या बहिणीला
बहिणी बहिणी भातुकलं दे
भातकुलं माझ्या भावाला
भावा भावा गोंडे दे
तेच गोंडें लेवू
सासरी जाऊ
सासरच्या वाटे
कुच् कुच् काटे
माहेरच्या वाटे
खारिक खोबरे दाटे

२

सांजी सांजी दिवा लगाव
दिवा लगाव
दिवा नेला चोरानं
चोरानं
बत्ती लाविली मोरानं
मोरानं
मोरानं दिल्या पाच कवड्या
पाच कवड्या
त्याच्या आणू रेवड्या
रेवड्या
रेवड्या देऊ भाचीला
भाचीला
आपण जाऊ काशीला
काशीला
काशीहून आणू वायकं
वायकं
फोडा सांजीचं टायकं
टायकं

३

काळी मुंगी व्याली बाई
हिचं दूध किती ?
पहिला पेला भरला बाई
दुसरा प्याला हाती

काळी मुंगी व्याली बाई
हिचं दूध किती ?
दुसरा प्याला भरला बाई
तिसरा प्याला हाती

काळी मुंगी व्याली बाई
हिचं दूध किती ?
तिसरा प्याला भरला बाई
चवथा प्याला हाती

काळी मुंगी व्याली बाई
हिचं दूध किती ?
चवथा प्याला भरला बाई
पाचवा प्याला हाती

पाचाचा आकडा
माळ घातली हनुमंता

हनुमंताची निळी घोडी
जाता जाता कमळं तोडी
कमळाच्या पाठीमागे लागली राणी
अग अग राणी कोठे चालली ?
जिथे होते चिलया बाळ
चिलया बाळाला भूक लागली
चांदीच्या चमच्याने दूध पाजियले
पाटाच्या घडीने तोंड पुशियले

४

काळा कोळसा करू बाई
शेर तूप मावेना
आमची भुलाबाई
चौपट खेळेना

चौपट खेळता लंपट झाली
वाटेवरला चांदोबा
वाटोळा दिसे
आमुची भुलाबाई
पातळ नेसे

पातळ नेसू द्या
गंगेवर जाऊ द्या
गंगेला आला लोंढा
भिजला माझा गोंडा
गोंड्याच्या पदरी रुपया
भाऊ माझा शिपाया
शिपायानं केली बायको
आडे घेऊ का कडे घेऊ
समुद्राच्या आड नेऊ
समुद्राला आला पूर
चाल ग सये भूर

५

आड बाई आड ग
इतका काय खोल ग ?
सोनियाच्या पायऱ्या
रुपयाचं मोल ग

विटी बाई विटी
अशी कशी विटी

भुलाबाईला लेक झाला
गावोगांव चिठ्ठी

दांडू बाई दांडू
असा कसा दांडू ?
भुलाबाईला लेक झाला
नाव ठेवा पांडू

• • •

# हनुमंताची निळी घोडी

डॉ. मधुकर वाकोडे

पावसाळा एकीकडे निरोप घ्यावयाच्या तयारीत असतो आणि हिवाळा दुसरीकडे आपल्या आगमनाची सूचना देत असतो, अशा कालखंडात प्रत्येक घर एक पिंपळपार बनलेले असते. भाद्रपद पौर्णिमेपासून तर आश्विन पौर्णिमेपर्यंत घरोघरी सायंकाळी मखरांतील भुलजा–भुलाईसमोर चिमण्यांचा चिवचिवाट चाललेला दिसतो. मधाच्या पोळचातून मध ठिबकावा, त्याप्रमाणे त्यांच्या गोड गळचांतून भुलाईची गीते आपोआप ठिबकत राहतात. केवढे अवीट माधुर्य असते त्या गीतांत !

वऱ्हाडात जेव्हा भुलाईची पूजा बांधली जाते तेव्हा महाराष्ट्रातील काही भागांत हादग्याची पूजा बांधली जाते. हादग्याच्या प्रेरणा मूलतः कृषिपरंपरेत आहेत, तर भुलाईच्या सर्जनात. हादगा वर्षनशील आहे तर भुलाई सर्जनशील. मखरातील भुलजा–भुलाईसमोर बाळ असते. भुलाबाई म्हणजे पार्वती. भूमीसारखी सर्जनशील. जगन्माता. भुलजा–भुलाईची पूजा ही शिव-शक्तीची पूजा. एक प्रकारचा सुफलन विधीच. कारण शिव-शक्ती म्हणजे बीज आणि योनी. वरवर पाहता भुलाईगीते निरर्थक वाटतात. परंतु परंपरेने आलेली ही गीते अप्रगल्भ अवस्थेतील मानवी मनाचा आविष्कारच. भारतीय परंपरेत व्यंजने योनीख्य आणि स्वर बीजरूप मानले गेले आहेत.[१]

---

१. मंत्र और मातृकाओका रहस्य : डॉ. शिवशंकर अवस्थी, पृ. १०६.

ह्या दिवसांत शिवार बेहोषीत डुलत असते. परकऱ्या पऱ्हाटीला डांगो-डांगी रंगीबेरंगी फुलं आलेली असतात. शिवारातल्या ह्या पोरीही जेव्हा वाऱ्यावर डुलतात तेव्हा त्यांची फुले कानातील डुलांसारखी डोलताना दिसतात. एकंदरीत घर-दार-शिवार डोलण्याचे हे दिवस.

अशा ह्या दिवसात धरित्रीसारखे चैतन्य मुलींच्या अंगोपांगांतून सळसळते. त्या गीतांत जणू काही त्यांना आपले श्रेयच सापडते. सर्जनशक्तीचा विकास व्हावा, मातृत्वभावनेचा परिपोष व्हावा आणि संतती संवर्धनाची दृष्टी निर्माण होऊन शक्तिदेवतेप्रमाणेच आपणही प्रजावती व्हावे, अशी अभिलाषा त्यांच्या ठिकाणी निर्माण करणारी, सुसंस्कार करणारी वाणी म्हणजेच भुलाईची गाणी. भलाईच्या गाण्यांतून यक्षसंप्रदाय आणि शक्तिसंप्रदाय यांच्या पाऊलखुणा आढळून येत असल्याने त्यांची प्राचीनता प्रामुख्याने जाणवते आणि यावरूनच ह्या पूजेमागील सामर्थ्यही दिसून येते.

आश्विन महिना हा स्कंदपूजेचा महिना. आश्विन पौर्णिमेस भुलाईच्या सोहळ्याची सांगता होते. ही बाब अतिशय महत्त्वाची ठरते; कारण हा 'स्कंदमह' साजरा करण्याचा दिवस[१] आणि स्कंद व स्कंदाचे पार्षद हा शंकराचा परिवार असल्याने मुलींनी स्कंदाचीही पूजा अनायसे बांधावी ही किती औचित्यपूर्ण बाब !

यावत् षोडश वर्षाणि भवन्ति तरुणाः प्रजाः
प्रबाधत मनुष्याणां तावद्रूपैः पृथग्विधैः[२]

सोळा वर्षांखालील मुला–मुलींना पीडा देण्याचा स्कंदाने आपल्या परिवारास परवाना देऊन टाकला. बालग्रह आणि मातृकांचा नियंता म्हणून

१. जैन आगम साहित्यमें भारतीय समाज : डॉ. जैन : पृ. ४३०–४३२.
२. महाभारत–वनपर्व; भांडारकर प्रत; २.१९ · २२.

स्कंद पूजनीय मानला गेला. पूजा बांधणाऱ्या मुली प्रायशः सोळा वर्षांखालील असतात आणि भावी काळच्या त्या माताही असतात.

भुलाईगीतांतील हे गीत सर्वच ठिकाणी गायिले जाते.

**एक लिंबू झेलू बाई दोन लिंबू झेलू**
**दोन लिंबू झेलू बाई तीन लिंबू झेलू**
**तीन लिंबू झेलू बाई चार लिंबू झेलू**
**चार लिंबू झेलू बाई पाच लिंबू झेलू**
**पाचाचा पायना माळ घाली हनुमंता**
**हनुमंताची निळी घोडी येता जाता कंबळं तोडी**

तथापि प्रस्तुत लेखात फक्त वरील गीतातील 'हनुमंत', 'निळी घोडी' आणि 'कंबळं' या प्रतीकांचाच तेवढा विचार करण्याचे योजिले आहे. मोठी हृद्य प्रतीके आहेत.

**हिंदुमुस्लीमांचे दैवत : महावीर हनुमंत** — भुलाईगीतांतील अनेक गाण्यात हनुमंताचा उल्लेख आढळतो. कधी कधी त्याच्या 'बाळ' स्वरूपाचाही निर्देश केला जातो. हनुमंत हा महावीर. आर्यपूर्व काळापासून या क्षेत्रपाळ श्रेणीतील दैवताचे सकाम साधनेत महत्त्व असलेले आढळून येते.

उत्तर भारतात हनुमंत प्राचीन काळापासून वीर देवता म्हणूनच पूजिला जातो. 'वीर' हा यक्षवाचक शब्द असल्याने तो भारतीय लोकधर्मात यक्षरूपानेच प्रविष्ट झाला. वीर देवतेलाच हिंदू वीर तर मुस्लीम लोक पीर असे म्हणतात. अनेक वेळा मुस्लीम विध्वंसक वृत्ती हनुमंताच्या बाबतीत पारमार्थिक बनलेली दिसून येते. अनेक मुस्लीम

स्त्री – पुरुषांनी नवसाला हमखास पावणारा म्हणून त्याला मान्यता दिलेली आढळून येते. हनुमंताच्या कृपेने व्याधी दूर होते, निपुत्रिकेला पुत्र प्राप्त होतो आणि अरिष्टें टळतात अशी लोकधारणा असल्याने त्याची पूजा बांधली जावी, हे स्वाभाविकच नाही काय ?

अवधचा नवाब मुहम्मद अलीशहाच्या बेगम रबियाला हनुमंताच्या कृपेने पुत्ररत्न लाभले.[१] लखनौच्या अलिपंजातील हनुमंताचे मंदिर तर नबाब शुजाउद्दौलाची पत्नी आलीया बेगम हिने स्वतः उभारले[२] आणि फैजाबादच्या मन्सुरअली नबाबाने तर हनुमंताच्या कृपेने त्याच्या पुत्राची भयानक व्याधी दूर झाल्याने ५२ बिघे जमीन हनुमंताच्या मंदिराला दान दिल्याची नोंद आढळते.[३] यावरून हनुमंताचे सकाम साधनेतील स्थान स्पष्ट होते आणि म्हणून तो भुलाईगीतांत प्रविष्ट झाला. भैरवाचे प्रतीक म्हणूनही.

**दोन सर्जक प्रतीके** – निळ्या घोड्याचा संकेत लोकवाङ्मयात सर्वत्र आढळतो. निळा रंग हा भारतीय परंपरेत कामतत्त्वाचे प्रतीक ठरतो. इंद्र ही देवता कामाचे प्रतीक. इंद्राचा निर्देश –

‘आ मन्द्रैरिन्द्र हरिभिर्याही मयूररोमभिः[४]’ मोरपंखासारखे ज्याच्या घोड्याचे केस आहेत असा इंद्र, असा आढळतो. किंबहुना इंद्र हाच ‘नील शिखण्ड कर्मकृत’ मोरपंखी निळ्या रंगाचा मानला गेला आहे.[५] आणि मोरसुद्धा कामतत्त्वाचे प्रतीकच ठरतो.

---

१. कल्याण : जानेवारी १९७५, पृ. ४३६.
२. तत्रैव : पृ. ३७.
३. तत्रैव : पृ. ४३२.
४. ऋग्वेद : ३ । ४५ । १.
५. अथर्ववेद : २ । २७ । ६.

पहिल्या शतकातील हाल राजाच्या 'गाथा सप्तशती' ह्या ग्रंथातही निळ्या रंगाचा निर्देश कामतत्त्वाशी संबंधित असाच सर्वत्र आढळतो.

उदा. विसेसणीलकञ्चुइआ । ७ । २०

किंवा

जे-णील भमर भरग्ग । ५ । २२

या गाथ्यामधील निळचा चोळीचा आणि निळ्या भ्रमराचा निर्देश विचारांती कामसूचकच मानावा लागतो. त्याचप्रमाणे भारतीय परंपरेत बैल, नाग आणि घोडा शक्तिसामर्थ्याची पुरुषतत्त्वाची प्रतीके ठरतात. अश्वशक्तीप्रमाणेच अश्विनी शक्तिरूप असे सर्जकतेचे प्रतीक ठरते.

'कंबळं' हे कमळ शब्दाचे अपभ्रष्ट रूप. बोली भाषेत उच्चार-प्रक्रियेमुळे कंबाळ, कंबळ किंवा कम्बय अशीही कमळाची रूपे आढळून येतात. पंडित महादेवशास्त्री जोशी म्हणतात : "कमल हे स्त्रीतत्त्व असून ते ज़ीवनोत्पादक आहे. कमल म्हणजे भूमि, योनि आणि चिच्छक्ति"[1] स्त्रियांच्या पोटावरील (गर्भाशयावरील) परवंटाला त्याचमुळे केळ किंवा कमळ असे म्हणतात.

**भुलाईगीते – मंत्र आणि रहस्य :** भुलाईगीतांनी केवढा तरी मोठा सांस्कृतिक ठेवा जतन करून ठेवलेला आहे याची कल्पना आल्यावर मन थक्क होऊन जाते. आणि ह्या संस्कृतिरक्षणाचे श्रेय ज्या पोरसवदा मुलींकडे द्यावे लागते त्या मुलींविषयी आदराची भावना नकळत मनात निर्माण होते. कविवर्य मर्ढेकरांच्या शब्दात भावना व्यक्त करावयाची झाल्यास "पोरसवदा होतीस काल परवापावेतो, थांब उद्याचे माऊली तीर्थ पायांचे वेईतो" असे म्हणावे लागेल.

---

१. संस्कृतीची प्रतीके : पृ. १२.

कित्येकांना भुलाईगीते निरर्थक वाटतात. बालिश वाटतात. अज्ञानी माणसाला ज्याप्रमाणे मंत्र केवळ शब्दबंबाळ वाटतात त्याप्रमाणेच विद्वानांना ही गीते शब्दबंबाळ वाटण्याची शक्यता आहे. एक लिंबू झेलूचा पाढा किंवा अक्कन माती-चिक्कण मातीचा पाल्हाळ कित्येकांना असह्यही होत असेल. परंतु गीतातील वर्णन ही बाब महत्त्वाची असल्याने आशयाला कधी कधी गौण स्थान प्राप्त व्हावे हे ओघानेच येते. शब्दातील मंत्रच्छटांचे सूक्ष्म ज्ञान आज आपणास ज्ञात नाही हीच खरी शोकान्तिका होय.

"निसर्गावर कसलेही नियंत्रण नसणाऱ्या मानवाला निसर्गचमत्कृतीचा नीट अर्थबोध होत नसे. म्हणूनच त्याच्या गीताचे वा गाथांचे नैसर्गिक प्रक्रियेशी साहचर्य प्रस्थापित झाल्यामुळे गीतामध्येच शक्ती असते अशी भोळी समजूत वन्य समाजांत रूढ झालेली असे. कवींच्या कवनातील शक्तीविषयी निरनिराळ्या भूप्रदेशांतील वन्य समाजांत दुर्दम्य श्रद्धा असे. ब्रिफॉल्ट यांच्या पाहणीनुसार फिनलंडमधील रानटी माणूस जखमा बऱ्या व्हाव्यात ह्यासाठी जखमांकडे बघून गाथेतील गीत गातो. सर्प किंवा विंचू ह्यांचे विष उतरावे ह्यासाठी आपल्याकडे मांत्रिक जे मंत्र म्हणतात तीदेखील निरर्थक गद्यकाव्येच असतात.[१] अशी 'मंत्र' या लेखात हरिहर घोगे यांनी केलेली मीमांसा प्रस्तुत भुलाईगीतांनाही यथार्थपणे लागू पडते. आणि असा हा चिमण्यांचा चिवचिवाट आशयाने नसला तरी सांस्कृतिक दृष्टया किती अफाट आहे याची कल्पना येते.

---

१. युगवाणी नागपूर : फेब्रुवारी-मार्च १९७४, पृ. – ८६१ – ८६२.

● ● ●

# महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समितीची प्रकाशने

## महाराष्ट्र लोकसाहित्य (पुष्प १ ले)

संपादन व प्रस्तावना : कै. चिं. ग. कर्वे

प्रकाशनकाल : १९५६

**भाग १ ला—लोकगीते**

मराठी भाषेत प्रचलित असलेली मल्हारकोळी, कोकणी, मुसलमान, रोमन कॅथॉलिक ख्रिश्चन, देशावरील पाठारेप्रभु, कोष्टी व शेतकरी समाजातील लोकगीते या विभागात देण्यात आलेली आहेत. शिवाय खानदेश व नाशिक विभागांमधील लोकप्रिय लोकगीतांचाही समावेश येथे करण्यात आलेला आहे.

**भाग २ रा—लोककथा**

मराठीतील काही निवडक व चटकदार लोककथांचा समावेश या विभागात करण्यात आला आहे. विषयांची विविधता, भाषेची जुनी धाटणी, ओघवती शैली व लहान लहान वाक्ये ही या लोककथांची वैशिष्ट्ये आहेत.

**भाग ३ रा—संकीर्ण लोकसाहित्य**

कानबाईच्या बैठकीतील विविध गाणी, मराठीत रूढ असलेले निरनिराळ्या प्रकारचे उखाणे व विविध खेळांची गाणी या विभागात देण्यात आलेली आहेत.

प्रकाशक : **लोकसाहित्य समिती**

किंमत : **तीन रुपये**

पृष्ठ संख्या : २२५.

**(या ग्रंथाची ही आवृत्ती संपलेली आहे.)**

## महाराष्ट्र लोकसाहित्य (पुष्प २ रे)

संपादन व प्रस्तावना : कै. चिं. ग. कर्वे

प्रकाशनकाल : १९५७

या ग्रंथाचे प्रारंभास मराठी लोकसाहित्यावरील इंग्रजीमधील ग्रंथलेखनाची व या विषयावरील इंग्रजी नियतकालिकांतील लिखाणाची माहिती देण्यात आलेली आहे.

### भाग १ ला—संकीर्ण लोकसाहित्य

या विभागामध्ये निरनिराळ्या विषयांवरील अनेक प्रकारची ओवीगीते, फेरांची गाणी, कोकणातील चकवे, मंगळागौरीची गाणी, रुखवताचे उखाणे, लोककथेचे काही नमुने, नगरी व खानदेशी लोकसाहित्य, ललिते आणि काही आचारविषयक समजुतींचा समावेश करण्यात आलेला असून त्यामध्ये विविधता आणि आकर्षकता येईल हे पाहिले आहे.

### भाग २ रा—नगरी लोकसाहित्य

सुलोचनाबाई सतर्षी यांच्या संग्रहीच्या अहमदनगर विभागातील ऐतिहासिक लोक-गीतांचा समावेश याच विभागातील इतर लोकसाहित्याबरोबर केलेला आहे. त्याचप्रमाणे येथे भलरी गीते, ओव्या, कथात्मक गाणी, वेरूळच्या लेण्याबद्दलची गीते, तुळशीच्या ओव्या, कहाण्या व दंतकथा विचारात घेतलेल्या आहेत.

### भाग ३ रा—खानदेशी लोकसाहित्य

खानदेशमधील अहिराणी भाषेतील लोकगीते, देवादिकांच्या संबंधीच्या ओव्या, ललिते, लोककथा, उखाणे व काही लोकसमज यांचा विचार या विभागात करण्यात आलेला आहे.

प्रकाशक : लोकसाहित्य समिती
किंमत : तीन रुपये
पृष्ठ संख्या : २४०.

**(या ग्रंथाची ही आवृत्ती संपलेली आहे.)**

## महाराष्ट्र लोकसाहित्य (पुष्प ३ रे)

संपादन व प्रस्तावना : कै. चिं. ग. कर्वे
प्रकाशनकाल : १९५९

या ग्रंथामध्ये विविध प्रकारच्या दंतकथा, दैवतकथा आणि देवताचार यांचा समावेश करण्यात आलेला असून त्या संबंधीची प्रदीर्घ प्रस्तावनाही दिली गेली आहे. या कथांची धाटणी निरनिराळी आहे. म्हणून प्रत्येक कथेच्या पूर्वी तिच्या संबंधीची पार्श्वभूमीही देण्याचा येथे प्रयत्न केलेला आहे. तसेच येथे वेगवेगळ्या घराण्याचे काही कुलाचारही सांगण्यात आलेले आहेत.

या कथा देत असताना काही ठिकाणी त्या त्यांच्या मूळच्या स्वरूपात दिल्या गेल्या आहेत. तर काही त्यांच्या उगमस्थानासंबंधीच्या हकीकतींसह दिल्या गेल्या आहेत. अशा या कथा निदान शंभराचे तरी आसपास असाव्यात. माणूस हा किती गोष्टीवेल्हाळ प्राणी आहे याची यावरून कल्पना येऊ शकते.

**प्रकाशक : लोकसाहित्य समिती**
**किंमत : तीन रुपये**
पृष्ठ संख्या : २३२.

**(या ग्रंथाची ही आवृत्ती संपलेली आहे.)**

## महाराष्ट्र लोकसाहित्य (पुष्प ४ थे)

संपादन व प्रस्तावना : कै. चि. ग. कर्वे
प्रकाशनकाल : १९६०

महाराष्ट्रातील आदिवासींच्या लोकसाहित्यावर आधारित असा हा ग्रंथ आहे. या ग्रंथात आदिवासींच्या चालीरीतींची, कलाकौशल्याची, नृत्यांची व लोकगीतांची माहिती एकत्रित करण्यात आली आहे. त्यासाठी खानदेशातील भिल्ल, नाशिक भागातील व ठण्याकडील कोळी, महादेव कोळी, वारली, कुलाब्याकडील ठाकूर व कातकरी, आंबेगावचे पारधी आणि जव्हारचे कोकणी या मंडळीचा विचार लक्षात घेतला गेला आहे. अधून-मधून या आदिवासींच्या जीवन वैशिष्ट्यांची काही छायाचित्रेही देण्यात आली आहेत.

आपल्यापेक्षा अनेकपरीनी भिन्न अशा संस्कृतीत वाढलेली ही माणसे. त्यांच्या या लोकसाहित्यामुळे या मंडळीच्या समाज जीवनासंबंधी बरीच माहिती उपलब्ध होत आहे. म्हणून समाजशास्त्राच्या अभ्यासाच्या दृष्टीनेही या ग्रंथाचे वैशिष्ट्य आगळे आहे.

**प्रकाशक : लोकसाहित्य समिती**
**किंमत : तीन रुपये**
पृष्ठ संख्या : २१०.

**(या ग्रंथाची ही आवृत्ती संपलेली आहे.)**

## महाराष्ट्र लोकसाहित्य (पुष्प ५ वे)

संपादन व छायाचित्रे : डॉ. सरोजिनी बाबर

प्रस्तावना : प्रा. वामन चोरघडे

चित्रकार : श्री. दीनानाथ दलाल

प्रकाशनकाल : १९६१

**भाग १ ला**

सर्वसामान्य स्त्रियांचेकडून देवदिकांच्यासंबंधी गायिली जाणारी लोकगीते, कृष्णदेवा-संबंधीची गाणी, निरनिराळ्या भक्तगणांचेकडून म्हटली जाणारी त्या त्या दैवतांबद्दलची लोकगीते, सांस्कृतिक जीवनाचे दर्शन घडविणारी खेळगाणी व उखाणे इत्यादींचा समावेश या विभागात करण्यात आलेला आहे. तसेच सणासुदीची गाणी देतेवेळी त्या संदर्भातील वेगवेगळी छायाचित्रेही येथे देण्यात आली आहेत. महाराष्ट्राच्या बहुतेक सर्व विभागातून हे लोकसाहित्य जमा केलेले असल्याने त्यात विविधताही भरपूर आहे.

**भाग २ रा**

लोकसाहित्यावर आधारित असे निरनिराळ्या मान्यवर लोकांनी अभ्यासून लिहिलेले सात लेख या विभागात देण्यात आलेले आहेत.

(१) मराठीचे माणिक मोती – श्री. न. शे. पोहनेरकर
(२) लोकगीतातील साम – श्री. सोपानदेव चौधरी
(३) लोकगीते आणि संगीत – डॉ. सरोजिनी बाबर
(४) विदर्भाची अस्मितादर्शक काही लोकगीते – श्री. ना. रा. शेंडे
(५) उखाणा – सौ. कुमुदिनी पवार
(६) सासुरवास – डॉ. विमल चोरघडे
(७) हळदीचे सांस्कृतिक स्थान – कै. चिं. ग. कर्वे

प्रकाशक : लोकसाहित्य समिती
किंमत : चार रुपये
पृष्ठ संख्या : ३२०.

(या ग्रंथाची ही आवृत्ती संपलेली आहे.)

## लोकसाहित्य आणि लोकसंस्कृति (पुष्प ६ वे)

प्रस्तावना व संपादन : डॉ. सरोजिनी बाबर

प्रकाशनकाल : मे १९६१

महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समितीच्या वतीने १९६१ च्या मे महिन्यात पुणे येथे भरविण्यात आलेल्या लोकसंस्कृती संमेलनाचा हा वृत्तांत आहे. या वृत्तांतामध्ये त्या वेळचे मुख्यमंत्री ना. यशवंतराव चव्हाण यांनी संमेलनाच्या उद्‌घाटनप्रसंगी केलेले भाषण, संमेलनाच्या प्रदर्शनाच्या वेळी ना. डॉ. वि. रा. नरवणे यांनी केलेले उद्‌घाटनाचे भाषण, लोकसंगीताच्या संगीतसभेच्या वेळी म. म. दत्तो वामन पोतदार यांनी केलेले उद्‌घाटनपर भाषण आणि संमेलनाच्या समारोपप्रसंगी ना. बाळासाहेब देसाई यांनी केलेले समारोपाचे भाषण या सर्वांचा समावेश आहे. तसेच या संमेलनात सादर केल्या गेलेल्या लोकनृत्यांची व संगीतसभेचीही छायाचित्रे या ग्रंथात देण्यात आलेली आहेत. याच वेळी मांडण्यात आलेल्या लोककलेच्या प्रदर्शनाची व एकूण संमेलन प्रसंगाचीही छायाचित्रे या ग्रंथाचे आणखी वैशिष्ट्य दर्शवितात.

लोकनृत्ये व संगीतसभा या दोन्ही प्रसंगी वाचण्यात आलेले निवेदनही त्या त्या प्रसंगाच्या निमित्ताने येथे देण्यात आलेले आहे. शिवाय या निमित्ताने गायिली गेलेली लोकगीते व सादर केलेले नृत्य प्रकारही या ग्रंथात मुद्दाम नमूद करण्यात आले आहेत.

निबंध वाचन हा संमेलनाचा एक ठळक विभाग होता. त्या वेळी वाचण्यात आलेले सर्व निबंध या ग्रंथात समाविष्ट केलेले असून ते असे आहेत :

(१) लोकसाहित्याची अस्मिता – डॉ. सरोजिनी बाबर
(२) लोकसाहित्यातील समाजजीवन – प्रा. वामनराव चोरघडे
(३) कोळ्यांची लोकगीते – प्रा. अनंत काणेकर
(४) लोकसाहित्य व स्त्रीजीवन – श्री. न. शे. पोहनेरकर
(५) लोकगीते आणि संगीतकला – डॉ. विमल चोरघडे
(६) अपौरुषेय वाङ्मयातील उखाण्यासंबंधी काही विचार – डॉ. कमलाबाई देशपांडे
(७) लोकसंगीत – श्री. सोपानदेव चौधरी
(८) लोकवाङ्मय व ज्ञानसत्र – श्री. बा. ग. हरसुलकर
(९) वऱ्हाडी लोकगीते – ना. मधुसुदन वैराळे
(१०) लोकगीते आणि सिनेसंगीत – श्री. पी. सावळाराम
(११) लोकसाहित्यातील विनोदाचे ओझरते दर्शन – प्रा. सौ. चारुशीला गुप्ते

(१२) लोकसंगीत आणि लोकनृत्ये—श्री. नामदेव व्हटकर
(१३) लोकगीतातील काव्य आणि कल्पनावैभव—श्री. ना. रा. शेंडे

प्रकाशक : **प्रसिद्धी संचालनालय, महाराष्ट्र शासन.**
किंमत : **दीड रुपया**
पृष्ठ संख्या : २७९.

**(या ग्रंथाची ही आवृत्ती संपलेली आहे.)**

## बाळराज (पुष्प ७ वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर
प्रकाशनकाल : आवृत्ती पहिली, मार्च १९६२
चित्रकार : श्री. दीनानाथ दलाल

ज्याच्या दर्शनानं मन प्रसन्न होऊन जावं आणि शीणभाग उतरल्यानं आयुष्याचं ओझं कमी करून नव्या उल्हासानं जगायची उमेद यावी त्या बाळराजसाचं दर्शन घडविणारा हा ग्रंथ आहे. सोन्यापेक्षाही मोठ्ठा ढिग दिसणारं बाळाचं हसरं मुख बघून समाधान पावणाऱ्या आणि मांडीच्या चौरंगावर त्याला बसवून आपल्या सहस्र अमृतधारा पाजणाऱ्या आईच्या काळजातील जिव्हाळा व्यक्त करणारी लोकगीतं इथं एकत्रित करण्यात आलेली आहेत. त्यासाठी या ग्रंथाच्या पोटात पाच रंगीत चित्रं आणि मुखपृष्ठावर सुंदर तिरंगी चित्र देण्यात या ग्रंथानं आपलं ऐश्वर्य भोगलेलं आहे.

उरीपोटी दाटलेल्या उमाळ्यानं प्रकट होणारं वात्सल्य या ग्रंथातील प्रत्येक पानावर आविष्कृत झालेलं दिसून येईल. हौसमौज धाधावून यावी न् किती बोलू न् किती नको असं वाटावं असा हा विषय कौडकवतिकाचा. त्यामुळं गीतं सांगून ज्यांचं भागलं नाही त्यांनी आपल्या बाळराजाविषयीचा मनोभाव व्यक्त करण्यासाठी या ग्रंथात २१ निबंध पहिल्या विभागामध्ये सादर केलेले आहेत. त्यांची तोंडओळख अशी :

(१) बाळ राजस ग माझा – श्री. न. शे. पोहनेरकर
(२) जुनी संस्कृति – श्रीमती गिरिजाबाई केळकर
(३) माऊली – श्री. अशोक देशपांडे
(४) तान्हेबाळ – सौ. मालतीबाई दांडेकर
(५) माता, बाळ आणि पाळणा – श्री. ना. रा. शेंडे

(६) शिशु गीते – सौ. आनंदीबाई शिर्के
(७) बाळलेणी – डॉ. सरोजिनी बाबर
(८) कोकणी लोकगीते – सौ. कमल वाघ
(९) खानदेशी स्त्रियांची गाणी – प्रा. गजमल माळी
(१०) अंगडीचं होतं घोंगडीचं झालं – सौ. तारा परांजपे
(११) स्त्रीगीतांतील वात्सल्यसिंधूचे भावोन्मेष – डॉ. हरिकिशन राठोर
(१२) लोकसाहित्यातील लेकरू – डॉ. ग. वा. तगारे
(१३) लावणीचा आंबा – प्रा. सौ. विमल थत्ते
(१४) राजसबाळ – डॉ. विमल चोरघडे
(१५) अहिराणी लोकगीतातील वात्सल्य – श्री. ग. दा. कुडे
(१६) माझ्या राजसाच जिणं – श्री. वि. वा. जोशी
(१७) विदर्भातील बालविषयक लोकगीते – डॉ. य. खु. देशपांडे
(१८) खानदेशातील बालगीते – श्री. दा. गो. बोरसे
(१९) माणिक मोत्याची रास – प्रा. आनंद यादव
(२०) जात्यावरील आई – श्री. पां. र. शिंदे
(२१) बाळ नेणंता ग माझा – श्री. हरिहर मातेकर

या ग्रंथाचे शेवटी सर्व लेखक संग्राहकांचा परिचयही थोडक्यात दिलेला आहे.

प्रकाशक : **प्रसिद्धी संचालनालय, महाराष्ट्र शासन.**
किंमत : **दोन रुपये**
पृष्ठ संख्या : २४०.

## बाळराज (पुष्प ७ वे)

प्रकाशनकाल : मे १९६७
चित्रकार : श्री. द. ग. गोडसे

या नवीन आवृत्तीसाठी पूर्वीच्यापेक्षा वेगळ्या प्रकारची व निराळ्या धाटणीची चित्रे सर्वत्र वापरण्यात आलेली आहेत.

पहिल्या विभागामध्ये अंगाई, कवतिक, दृष्ट, संस्कार व बाळगाणी असे निरनिराळे भाग पाडले असून ओव्या व लोकगीते दिलेली आहेत. त्यासाठी एकूण ६२ संग्राहकांनी हातभार लावलेला आहे.

दुसऱ्या विभागामध्ये निरनिराळे १६ लेख देण्यात आलेले असून डॉ. कृष्णदेव उपाध्याय यांचा हिंदीतील "हिंदी के बालगीत" हा लेख व डॉ. सौ. सविता जाजोदिया

यांचा "बाळराजविषयक मराठी व अन्य प्रांतीय लोकगीते" हा लेख नव्याने घातलेला आहे.

मुखपृष्ठावरील आकर्षक तिरंगी चित्र व पुस्तकाच्या प्रारंभी आणि अखेरीस दोन्ही पानांवर वापरलेली सुंदर चित्रे ह्या ग्रंथाची आगळी शोभा वाढवीत आहे.

प्रकाशक : **शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र शासन.**
किंमत : **तीन रुपये**
पृष्ठ संख्या : ४५०.

## लोकसाहित्य : भाषा आणि संस्कृति (पुष्प ८ वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर
चित्रकार : श्री. वि. शं. पाथरकर
प्रकाशनकाल : १९६३

लोकसाहित्य, भाषाशास्त्र आणि संस्कृतीविषयक जोपासनेची आवड असलेल्या जाणकार साहित्यिकांनी लिहिलेल्या विविध निबंधांचा हा संग्रह आहे. अशा प्रकारचे मराठीतील हे एकमेव प्रकाशन असावे. भाषाशास्त्राच्या अभ्यासकांना ते अधिक उपयुक्त ठरेल. या ग्रंथातील निबंधकार व त्यांचे विषय असे आहेत :

(१) श्री. कृ. पां. कुलकर्णी – लोकसाहित्याची शब्दसंपदा व साद–पडसाद शब्द,
(२) श्री. श्री. ना. बनहट्टी – स्त्री–गीतांचे शब्दार्थवैभव
(३) डॉ. ग. मो. पाटील – लोकभाषेचे व्याकरण
(४) श्री. न. शे. पोहनेरकर – मराठीच्या माहेरातील काही शब्दविशेष
(५) श्री. नी. शं. नवरे – मराठी म्हणींची मीमांसा
(६) प्रा. अनंत काणेकर – सोनकोळ्यांची भाषा
(७) प्रा. गजमल माळी – लोकसाहित्याची निर्मिती आणि परंपरा
(८) डॉ. सरोजिनी बाबर – लोकगीते : स्वररचना

ग्रंथाचे शेवटी सर्व लेखकांचा परिचयही देण्यात आलेला आहे.

प्रकाशक : **लोकसाहित्य समिती**
किंमत : **दोन रुपये**
पृष्ठ संख्या : ११४.

## जा माझ्या माहेरा (पुष्प ९ वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर

चित्रकार : श्री. दीनानाथ दलाल

प्रकाशनकाल : आवृत्ती पहिली १९६३

आवृत्ती दुसरी १९६४

एका डोळ्यात आसू न् एका डोळ्यात हसू अशा ओढाताणीत गवसणाऱ्या सासुरवाशीणीने आपल्या दोन्ही घराण्यातील सुखदुःखांची केलेली गुजगोष्ट सांगणारा हा संग्रह आहे. जन्मोजन्मीच्या जिव्हाळ्यांनी मनोभावे जोपासलेला असा हा विषय. त्यामुळे दुःखाचे कढ ओसरताना जिवाला वाटणारा हलकेपणा, सुखाच्या राशीवर उभे असताना होणारा आनंद आणि सासुरवासाने होणारी कुचंबणा या विविध प्रकारच्या आविष्काराने हृद्य झालेली भावगंगा इथे दुथडी भरून वहात आहे. मनमोकळेपणाने झालेले हे बोलणे म्हणूनच प्रत्येकाच्या काळजाचा ठाव घेणारे ठरले आहे. त्यासाठी लोकगीतांचे, कथांचे, उखाण्यांचे व म्हणींचे वापरलेले माध्यम इथे जणू अपुरे पडले आहे आणि म्हणूनच काही निबंधकारांनी आपले वेगळे जग उभे करायचा प्रयत्न करीत असताना १५ निबंधांचा साज या जिव्हाळ्याच्या पुस्तकासाठी वापरलेला आहे.

(१) सौ. लीलाराजे पटवर्धन – जिवाभावाची गीता
(२) श्री. न. शे. पोहनेरकर – कर्मयोगिनीचे जीवन
(३) सौ. आनंदीबाई शिर्के – माझिया माहेरी जा
(४) सौ. कुमुदिनी पवार – अंतरीचे गुज
(५) श्री. रा. आ. कदम – गोष्ट मनीची बोलते
(६) सौ. तारा परांजपे – नांदते मी भाग्याने
(७) श्री. पां. र. शिंदे – सासुरवाशीण
(८) प्रा. सौ. विमल थत्ते – सई जाते माहेराला
(९) सौ. मालतीबाई दांडेकर – सासर–माहेर
(१०) डॉ. विमल चोरघडे – अस्सं सासर द्वाड बाई
(११) श्री. वि. वा. जोशी – घर माझे मोठे
(१२) श्री. प्यारेलाल गोहेल – वंजारी लोकगीतांतील, "सासर–माहेर" संबंधीचे काही करुण प्रसंग
(१३) डॉ. सरोजिनी बाबर – रेशीम गाठी
(१४) प्रा. वामनराव चोरघडे – माहेर तुटत नाही, सासर सुटत नाही
(१५) सौ. सविता जाजोदिया – सासर–माहेरविषयक मराठी व अन्य प्रांतीय लोकगीते

या ग्रंथाच्या प्रत्येक विभागास वेगळी प्रस्तावना असून स्त्रीजीवनातील विविध प्रसंग दर्शविणारी तीनरंगी चित्रेही दिलेली आहेत. खेरीज परंपरागत गोंदणाची व ठिपक्यांच्या रांगोळ्यांचीही सुंदर चित्रे येथे त्यांच्या माहितीसह मुद्दाम दिलेली आहेत. त्यामुळे सुसंस्कृत स्त्रीजीवनाची या ग्रंथावरून भरपूर कल्पना येऊ शकते.

प्रकाशक : **प्रसिद्धी संचालनालय, महाराष्ट्र शासन.**
किंमत : **साडेतीन रुपये**
पृष्ठ संख्या : **५८०, ५६० अनुक्रमे.**

## एक होता राजा (पुष्प १० वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर
चित्रकार : श्री. दीनानाथ दलाल
प्रकाशनकाल : आवृत्ती पहिली १९६४

पुरुष मंडळींकडून गायिल्या जाणाऱ्या लोकगीतांचा व त्यांचेकडून सांगण्यात येणाऱ्या लोककथांचा हा संग्रह आहे हेच या ग्रंथाचे प्रमुख वैशिष्ट्य आहे.

**भाग १ ला**

भवानी देवीची गाणी, वासुदेवाची गाणी, पोतराजाची गाणी, यलम्मादेवीची गाणी या विभागात देण्यात आली आहेत व १५ संग्राहकांनी त्यास हातभार लावला आहे.

**भाग २ रा**

या विभागात धनगरांची गाणी देण्यात आली असून त्यातील विविधता नऊ संग्राहकांनी दर्शविण्याचा प्रयत्न केला आहे.

**भाग ३ रा**

या विभागात गोंधळ्यांची व वाघ्या मुरळींची गाणी आली असून त्यात गोंधळ, पदे, चेंडूफळी, आरती इत्यादी विविध प्रकारही आले आहेत. एकूण बारा संग्राहकांनी त्यात भाग घेतलेला आहे.

**भाग ४ था**

या विभागात लोकगीतातील गौळणी, मोटेवरची गाणी, भलरी गीते, दिवाळीची गाणी, अंगणातील लोकगीते, जडावाची गाणी इत्यादी प्रकारची लोकगीते दिलेली आहेत. त्यामध्ये कामकाजाबरोबरच फावल्या वेळी म्हटल्या जाणाऱ्या गीतांचाही समावेश करण्यात आलेला आहे. या गीतांचे संग्राहक, जवळजवळ ३५ आहेत.

**भाग ५ वा**

कोकणी लोकगीते व आदिवासींची लोकगीते या विभागात देण्यात आली आहेत व १९ संग्राहकांनी ती मिळविलेली आहेत.

**भाग ६ वा**

या विभागात म्हणी देण्यात आल्या असून त्या १७ संग्राहकांचेकडून आलेल्या आहेत. तसेच म्हणींच्यावर आधारित पाच संग्राहकांनी सांगितलेल्या कथाही येथे दिलेल्या आहेत. याच ठिकाणी काही कोडी-हुमान देखील समाविष्ट करण्यात आली असून १८ संग्राहकांनी ती मिळविलेली आहेत.

**भाग ७ वा**

वीस लोककथांचा हा विभाग आहे. ह्या कथा १३ मंडळींनी दिलेल्या असून धाटणीच्या दृष्टीने त्यात विविधताही आहे.

**भाग ८ वा**

निरनिराळ्या अभ्यासू मंडळींनी लिहिलेल्या नऊ लेखांनी सजलेला हा विभाग आहे :

(१) वारल्यांची लोकगीते – श्री. के. जे. सावे
(२) आंबवण्या – प्रा. अनंत काणेकर
(३) पुरुष समाजाचे लोकसाहित्य – श्री. न. शे. पोहनेरकर
(४) लोकसाहित्यातील काही अध्यात्म रसधारा – श्री. ना. रा. शेंडे
(५) चांदा जिल्ह्यातील लोकसाहित्य – कै. मा. सां. कन्नमवार, माजी मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
(६) लोकगीतांना पुरुषांची देणगी – डॉ. विमल चोरघडे
(७) कोरकू लोकजीवन – श्री. डी. बी. प्रधान
(८) वंजारी समाजाच्या पुरुष वर्गात प्रचलित असलेले लोकसाहित्य – श्री. प्यारेलाल गोहेल
(९) भारतीय लोकनृत्ये – सौ. सविता जाजोदिया

या प्रत्येक विभागाला निरनिराळी छोटी प्रस्तावना असून एकूण ग्रंथाची अशीही एक प्रदीर्घ वेगळी प्रस्तावना या ग्रंथामध्ये आहे. तसेच प्रत्येक विभागाचे वैशिष्ट्य दर्शविणारी रेखाचित्रे व विविध प्रकारच्या लोकनृत्यांची छायाचित्रे ही या ग्रंथाचे वेगळे वैशिष्ट्य दर्शवितात.

**आवृत्ती दुसरी**

ही आवृत्ती पुस्तकाच्या आकाराच्या दृष्टीने जशी वेगळी आहे तशीच पृष्ठसंख्येच्या

वाबतीतही संक्षिप्त करण्यात आलेली आहे. दुसऱ्या आवृत्तीचा एकूण ढंगच एकदम वेगळा दिसून येईल.

प्रकाशक : प्रसिद्धी संचालनालय, महाराष्ट्र शासन.
किंमत : पांच रुपये
पृष्ठ संख्या : ५००.

## लोकसाहित्य : साजशिणगार (पुष्प ११ वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर
चित्रकार : श्री. दीनानाथ दलाल
प्रकाशनकाल : १९६५

मराठीतील लोकसाहित्य आणि मराठी विभागातील लोकसंस्कृती या संदर्भातील संशोधनाचा व अभ्यासाचा आढावा घेता यावा म्हणून १७ जुलै १९६४ रोजी लोकसाहित्य समितीने एक खास संमेलन आयोजित केले होते. त्यावेळी या संमेलनाचे उद्‌घाटन भारताचे त्या वेळचे संरक्षणमंत्री ना. श्री. यशवंतराव चव्हाण यांनी केले होते आणि या संमेलनात निरनिराळ्या व्यक्तींनी एकूण २१ निबंध वाचले होते. त्या सर्व निबंधांचा हा संग्रह आहे. ते निबंधकार व त्यांचे विषय असे :

(१) लोकगीतांची घराणी—डॉ. सरोजिनी बाबर
(२) लोकवाङ्‌मयातून प्रकट होणारी महाराष्ट्राची वेशभूषा—सौ. अनसूया लिमये
(३) अहिराणी लोकगीतातील स्त्रीजीवन—प्रा. राजा महाजन
(४) लोकगीतातील प्रेरणा—प्रा. श्री. ना. बनहट्टी
(५) सोनकोळी स्त्रीपुरुषांचे रंगरूप—प्रा. अनंत काणेकर
(६) सहित नेणारे लोकसाहित्य—श्री. सोपानदेव चौधरी
(७) लोकसाहित्य : रंग, रूप, रस आणि गंध—श्री. ना. रा. शेंडे
(८) लोकसाहित्याची भाषा—डॉ. ग. मो. पाटील
(९) लोकसाहित्यातील प्रादेशिकता—सौ. मालतीबाई दांडेकर
(१०) लोकसाहित्यातील संत संदर्भ—श्री. न. शे. पोहनेरकर
(११) लोकवाङ्‌मयातील समाजजीवन—सौ. शरदिनी मोहिते
(१२) ग्रामदैवते आणि लोकसाहित्य—श्री. बाबासाहेब बापूसाहेब देसाई
(१३) उखाणा—सौ. कुमुदिनी पवार

(१४) लोककथा आणि म्हणी – सौ. लिलाराजे पटवर्धन
(१५) पंजाबी लोकगीते – श्री. न. वि. गाडगीळ
(१६) विभिन्न प्रांतीय लोकगीतांतून आढळणारे रस – सौ. सविता जाजोदिया
(१७) मऱ्हाटी लोककला – प्रा. गजमल माळी
(१८) लोकसंगीत – डॉ. विमल चोरघडे
(१९) लोकसाहित्य : संकलन आणि संग्रह – प्रा. वामनराव चोरघडे
(२०) लोकसाहित्य : आपला एक अमोल ठेवा – श्री. विनोद राव
(२१) Folk Arts will Live for ever – Shri Binod U. Rao

या ग्रंथामध्ये लोककलेच्या क्षेत्रात मोडणाऱ्या काही कलाकृतींची रेखाचित्रेही देण्यात आलेली आहेत.

प्रकाशक : प्रसिद्धी संचालनालय, महाराष्ट्र शासन.
किंमत : दोन रुपये
पृष्ठ संख्या : २६९.

## जनलोकांचा सामवेद (पुष्प १२ वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर
चित्रकार : श्री. दीनानाथ दलाल
प्रकाशनकाल : १९६५

देवादिकांच्या संबंधीचे लोकसाहित्य एकत्रित केलेला असा हा एक महत्त्वपूर्ण ग्रंथ. दोन्ही बाजूंची वेष्टने झाकणारे भव्य असे दिंडीचे मुखपृष्ठ. दोनरंगी अनेक चित्रांनी सजविलेले अंतरंग. २१ विभागांच्या छोट्या पण चटकदार प्रस्तावना. ८० संग्राहकांचे सहकार्य, ओव्या, लोकगीते, लोककथा यांची भरपूर लयलूट.

भगवती उषा, कुलदैवते, नवस, शंकरपार्वती, रामसीता, कृष्णरुक्मिणी, विठ्ठल-रखुमाई, पंढरी नगरी, मारुती, तुळस, ज्ञानदेव, तुकाराम, जनाई, साधुसंतांचे गणगोत आणि लोकमाता इत्यादींचा सामान्य मंडळींनी मोठ्या जिवाभावाने व्यक्त केलेला हा भावनाविष्कार खरोखरच फार आगळा आणि सगळ्यात सगळा वाटावा असा अपूर्वाईचा आहे.

याच विषयावरील अखिल भारतीय संदर्भातील सौ. सविता जाजोदिया यांचा एकमेव लेख या ग्रंथाचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणावे लागेल.

हा ग्रंथ मराठीचे प्रख्यात लोकसाहित्यकार पूज्य कै. साने गुरुजी यांना अर्पण केलेला आहे.

प्रकाशक : **प्रसिद्धी संचालनालय, महाराष्ट्र शासन.**
किंमत : **पांच रुपये**
पृष्ठ संख्या : ९३२.

**(या ग्रंथाची ही आवृत्ती संपलेली आहे.)**

## तीर्थांचे सागर (पुष्प १३ वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर
चित्रकार : श्री. दीनानाथ दलाल
प्रकाशनकाल : १९६७

बाप्पाजी न् वया दोन अमृताची कुंडं. त्यात आमचा पिंड देवानं घडविलेला. बाप्पाजींच्या महासागरात माताजींनी नाव सोडलेली न् आवल्या मारत्या देवानं आम्हाला त्यातून तारून आणलेलं. तर या बर्फाच्या घरात न् अंजिराच्या झाडात आम्हाला सावली मिळालेली. या समिंदरात न् या वाहत्या गंगेत स्नान करून आम्ही श्रीरंग ठरलेलो. त्या आमच्या आईवडिलांच्याबद्दलची ही भावगंगा आहे. पिढ्या न् पिढ्यांनी काळजाच्या कप्प्यात ठेवून जतन केलेली ही आयुष्यातील श्रेष्ठतम कल्पना आहे. वात्सल्यानं दाटलेल्या या उमाळ्यात न्हाऊन साजिवंत होणारे भाग्यवान तुम्ही आम्ही आहोत. ७८ भाग्यवंतांनी या पुण्यशील भावनेनं संग्रहित केलेला हा गंगासागर आहे. त्यात सुस्नात होऊन हे देह-भांडं उजळून घेणं हे ज्याचं त्याचं काम आहे. आम्ही कशाला त्यात काही बोलावं? यातल्या गीतांनी न् कहाण्यांनी ते काम आधीच उरकलंय आणि सहा मातब्बर मंडळींनी देखील त्या संबंधात काही सांगितलंय. तर त्यांचा तोंडवळा असा :

(१) आधी गाते मी मातापिता – सौ. लिलाराजे पटवर्धन
(२) तीर्थांचे दोन मंगल चरण – श्री. ना. रा. शेंडे
(३) कोकण्यांची लोकगीते – श्री. के. जे. सावे
(४) सोनकोळ्यांची पूर्वजपूजा – प्रा. अनंत काणेकर
(५) आई आणि लाडकी – सौ. कुमुदिनी पवार
(६) जळहरजामी बाबुल मॉंगॉ – डॉ. सौ. सविता जाजोदिया

या ग्रंथातील वडीलधाऱ्यांची तीनरंगी चित्रे फारच प्रेक्षणीय आहेत.

प्रकाशक : **शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र शासन.**
किंमत : **पांच रुपये**
पृष्ठ संख्या : **५०४.**

## राजविलासी केवडा (पुष्प १४ वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर

चित्रकार : श्री. दीनानाथ दलाल

प्रकाशनकाल : १९६८

ज्यांच्याबद्दल फारसं बोलायचं नसतं आणि ज्यांचं नाव घेतलं असता त्यांचं आयुष्य कमी होतं या खुळ्या समजुतीनं "इकडून येणं झालं" असली भाषा चुकून कधीतरी काढीत असताना लाजाळूचं झाड बनून घराण्याची चालरीत सांभाळायची असते अशा घरधन्याबद्दलची आणि त्यांच्या मालकीणीसंबंधीची लोकगीतं न् कहाणी या ग्रंथात सांगितलेली आहे. त्यासाठी सहा विभाग पाडलेले असून लगीन ठरल्यापासूनचे सारे सोपस्कार इथं बोलून दाखविलेले आहेत. एकमेकांच्या ओळखीसाठी म्हणून उखाण्यांचाही वापर केलेला असून जावईबापूंच्या गमती जमती पण वर्णन केलेल्या आहेत. त्यामुळं जिकडे तिकडे मुग्ध शृंगार इथं हसत खेळत वावरताना दिसत असून त्यात सुखावलेल्या पतीपत्नींचंही मनोहारी दर्शन घडविण्याची किमया या ग्रंथानं केलेली आहे. त्यात भरीस भर म्हणून अधूनमधून पाचसहा तिरंगी चित्रांची योजना केलेली असून मुखपृष्ठ दोन्ही बाजूंनी सजविलेलं आहे. तशात राजविलासी केवडा या नावानंच नवऱ्याएकी सगळं बोलून टाकल्यानं या ग्रंथाचं आकर्षण वाढविण्याची आणखी काही वेगळी खटपट करावी लागलेली नाही. तरीपण तेरा चौदा लोकसाहित्यकारांनी या विषयाबद्दलचा आपला मनोभाव व्यक्त केला आहे.

(१) लोकगीतातील नववधू व तिचे कवतिक – श्री. न. शे. पोहनेरकर
(२) माझ्या चुड्याचं ग सोनं – प्रा. सौ. विमल थत्ते
(३) जीवनसाथी – सौ. कुमुदिनी पवार
(४) बाळराजाचं कोडकवतिक – सौ. अनूसया लिमये
(५) घरधनी व त्याची राणी – सौ. मालतीबाई दांडेकर
(६) मिळते जुळते घेतलेच पाहिजे – प्रा. डॉ. सौ. चारूशीला गुप्ते
(७) वारल्यांचे संसार – श्री. के. जे. सावे
(८) जानपदांची बोली – सौ. शरदिनी मोहिते
(९) हौशा भरताराची नार – सौ. शरदिनी मोहिते
(१०) चुड्याची पर्वणी – डॉ. ग. मो. पाटील
(११) विदर्भातील लग्नसोहळा – श्री. बाजीराव पाटील
(१२) आदिवासीयांची विवाहपद्धती – श्री. वि. वा. जोशी
(१३) हौशा कांताची पारयीक – डॉ. सरोजिनी बाबर
(१४) विविध प्रांतातील प्रेमगीते – डॉ. सौ. सविता जाजोदिया

या ग्रंथाचे शेवटी त्यातील विविध विषयांची व त्यासाठी हातभार लावलेल्या शंभरावरील संग्राहकांची सूची जोडलेली असल्याने या ग्रंथास कोणी कसा हातभार लावला, तेही लक्षात येते.

**प्रकाशक : शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र शासन.**
**किंमत : साडेसात रुपये**

पृष्ठ संख्या : ७२४.

## जाई मोगरा (पुष्प १५ वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर
चित्रकार : श्री. दीनानाथ दलाल
प्रकाशनकाल : दिवाळी १९६९

एकमेकांच्या गाठी भेटीनं ज्यांच्या दारी चांदणं फुलतं आणि ज्यांच्या मुखीच्या रसवंती बोलण्यानं घरदार घुमून जातं त्या बहीणभावांना एकमेकांचा फार आधार असतो. एका शिंपल्यात उगवेलेल्या या मोत्यांच्या घोळयामेळयात सारं घर सुखावतं. शेल्यापागोट्यांचे सोगे भुईला लोळवीत येतेला माहेरचा चंद्र जरी चिरडी नेसून रूणझुणत्या पायांनी उभ्या घराला साजिवंत करतेल्या मखमलीला आभाळाएवढा मोठा दिसतो. जाई मोगऱ्याची ही निरपेक्ष भेट आभाळाला देखील ठेंगणं करावं म्हणते न्...

नको धन नको मुद्रा नको मोतीयांचे हार
देई प्रेमाश्रूंची धार भाईराया

या झोकानं सुखावते. हा प्रेमाचा सागर जिवाचा जिवलग होऊन सुखाचं माहेर होत जेव्हा त्याच्या बहिणीला भेटतो तेव्हा सागरालादेखील उधाण येतं. या प्रेमाची सर कशाला म्हणून कशालाच येत नाही. ही विसाव्याची झाडं एकमेकांच्या कुजबुजीतल्या ब्रह्मानंदात बुडून जातात आणि मानवी आयुष्याला देखील चकित करून सोडतात. तर त्यातलाच काही वानवळा या ग्रंथानं टिपला आहे. सुखदुःखाला त्या तोलानं जोकलं आहे.

इथं बहीणभावांच्या डामडौलाची सुखी हसरी चित्रं आहेत. गीतं आहेत. कहाण्या आहेत. लेख आहेत. अनेक लोकसाहित्यकारांचा मनोहारी मेळा इथं बसला आहे. यातल्या रत्नहाराची देखणी सजावट झाली ती अशी :

(१) माहेरचा मुराळी – श्री. न. शे. पोहनेरकर
(२) बहीणभाऊ — श्री. के. नारायण काळे
(३) जिवाभावाचे नाते – श्रीमती गिरिजाबाई केळकर
(४) माझे लाडके भावा – श्री. खं. ज. सावे

(५) शिंपल्यातले मोती – सौ. कुमुदिनी पवार
(६) ताळेबंदीचा भोवरा – डॉ. सरोजिनी बाबर
(७) बीजेची कोर – सौ. मालतीबाई दांडेकर
(८) विभिन्न प्रांतीय लोकगीतातून भेटणारे बहीणभाऊ – डॉ. सविता जाजोदिया
(९) भाई - बहन सम्बन्धी मालवी लोकगीत – डॉ. श्याम परमार

या ग्रंथाचे एकूण सात निरनिराळे विभाग असून त्या त्या विभागाला व एकूण ग्रंथाला अशा विविध प्रस्तावना आलेल्या आहेत. तसेच प्रारंभी विविध लोकसाहित्य-कारांची व संग्राहकांची नोंदही केलेली आहे.

प्रकाशक : **महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समितीच्या वतीने महाराष्ट्र शासनाच्या शिक्षण विभागातर्फे प्रकाशित.**

किंमत : **दहा रुपये पंचाहत्तर पैसे**

पृष्ठसंख्या : **७३६.**

## सांगीवांगी (पुष्प १६ वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर

चित्रकार : श्री. दीनानाथ दलाल

प्रकाशनकाल : १ मे १९७०

घरापुढचं अंगण. चांदणी रात्र. आजोबांची बैठक मुलाबाळांची वर्दळ. गोष्टींचा उपसा. रात्रीचा एकांत. तर अशा वेळी कहाणी सांगणारा रंगात येतो. ऐकणारे सुखाव-तात. अद्‌भुताचं वातावरण देहभान विसरून टाकतं. जीवाला चटका लागतो. तहानभूक हरपून जाते. बाळगोपाळांची मजाच मजा. मोठा माणूस मुलात मूल होऊन जातो. अंगण कसं साजिवंत होऊन उठतं. गोष्टीतल्या कथानकाबरोबर सगळीच वाहवत जातात. पार कुठल्या कुठं.

इथं या पुस्तकात अशाच एकवीस चटकदार गोष्टी आलेल्या आहेत. या गोष्टींचा चेहरामोहरा असा आहे की, त्यांच्यावर मुलांच्या उड्याच उड्या पडाव्यात.

पुस्तक सचित्र व सुंदर असून मुलांच्या खास आवडीचं असं आहे.

प्रकाशक : **महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समितीच्या वतीने महाराष्ट्र शासनाच्या शिक्षण विभागातर्फे प्रकाशित.**

किंमत : **तीन रुपये पन्नास पैसे**

पृष्ठ संख्या : **१३८.**

**(या ग्रंथाची ही आवृत्ती संपलेली आहे.)**

## नंदादीप (पुष्प १७ वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर.

चित्रकार : श्री. ग. ना. जाधव

प्रकाशनकाल : २६ जानेवारी १९७२

सण, उत्सव, व्रत, यात्रा इत्यादी विषयांवरील एकूण एकवीस निबंधाचा हा एक वैशिष्ट्यपूर्ण संग्रह आहे. या ग्रंथातील निबंधकार व विषय असे आहेत :

(१) वेदकालीन लोकसाहित्य – तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी
(२) आदिमाया आदिशक्ती – श्री. कृ. भा. बाबर
(३) पंचारती – डॉ. म. वि. गोखले
(४) आमचा स्वर, आमचा ताल – डॉ. सरोजिनी बाबर
(५) कहाणी नवसाची – डॉ. म. अ. दळवी
(६) आमचे सण, आमची व्रते – श्रीमती गिरिजाबाई केळकर
(७) सोनकोळ्यांची धार्मिकता – प्रा. अनंत काणेकर
(८) परधानांचे सण व उत्सव – डॉ. भाऊ मांडवकर
(९) आदिवासींचे सण – प्रा. जयंतराव पाटील
(१०) महादेवा जाता गा – डॉ. सौ. विमल केळकर
(११) नागविदर्भातील सण, यात्रा आणि कुळाचार – श्री. टी. जी. देशमुख
(१२) मराठवाड्यातील कुलदैवते – श्री. न. शे. पोहनेरकर
(१३) आमची लोककला – सौ. कुमुदिनी पवार
(१४) लोकनृत्ये – सौ. शरदिनी मोहिते
(१५) यात्रा – श्री. आनंदराव पाटील
(१६) मंदिरातील शिल्प – प्रा. गो. बं. देगलूरकर
(१७) ग्रामदेवता – पं. महादेवशास्त्री जोशी
(१८) तीज तिव्हॉरा – डॉ. सौ. सविता जाजोदिया
(१९) वृक्षपूजा – सौ. सुलोचना लिमये
(२०) जोगी-जीवन (हिंदी) – सौ. मालती शर्मा
(२१) Dogra-Pahori Folk Songs (English) – Dr. Karan Singh

या ग्रंथात लेखकांची छायाचित्रे देण्यात आली असून थोडक्यात त्यांचा परिचयही त्यांच्या लेखाचे प्रारंभी आहे.

**प्रकाशक : लोकसाहित्य समिती**

**किंमत : पाच रुपये**

**पृष्ठ संख्या : ३७२.**

## शब्दकोश (पुष्प १८ वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर

प्रकाशनकाल : १४ जानेवारी १९७३

महाराष्ट्राच्या लोकसाहित्य समितीने प्रकाशित केलेल्या लोकसाहित्य विषयक सर्व प्रकाशनांमधून व मराठीतील याच विषयावरील इतरांच्या प्रकाशित ग्रंथांमधून आलेल्या खास ग्रामीण आणि बोली भाषेतील शब्दांचे अर्थ व्युत्पत्तीसह येथे देण्यात आलेले आहेत. अशाप्रकारचा हा बहुधा पहिलाच शब्दकोश असून या ग्रंथात नागर मराठीतून तसेच इंग्रजीतूनही बोली भाषेतील शब्दांचे अर्थ देण्यात आलेले आहेत. या ग्रंथात समाविष्ट करण्यात आलेल्या विविध पुस्तकांची त्रोटक नावेही प्रारंभी दिली आहेत.

प्रकाशक : **महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समितीच्या वतीने महाराष्ट्र शासनाच्या शिक्षण विभागातर्फे प्रकाशित.**

किंमत : **सात रुपये पन्नास पैसे**

पृष्ठ संख्या : **३९१.**

## कुलदैवत (पुष्प १९ वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर

चित्रकार : श्री. ग. ना. जाधव

प्रकाशनकाल : २६ जानेवारी १९७४

प्रत्येक घराण्याचं असं एखादं ठराविक कुलदैवत असतं. घरात काही महत्त्वाचं सांस्कृतिक कार्य निघालं की, या कुलदैवतानं आपल्यावर नेहमीच प्रसन्न रहावं म्हणून त्याची महापूजा बांधली जाते. वर्षाकाठी एकदा यात्रेच्या निमित्तानं जनलोकांच्या साक्षीनं दर्शन घेतलं जातं. अशावेळी कुलाचार पाळले जातात. वाडवडिलांची चालरीत लक्षात घेतली जाते व त्याप्रमाणं वागणं बोलणं होतं. तर हे ध्यानात घेऊन महाराष्ट्राच्या प्रमुख कुलदैवतांची माहिती या ग्रंथात समाविष्ट करण्यात आलेली आहे.

शंकर पार्वती, गणपती, खंडोबा, तुळजाभवानी, ज्योतिबा, रेणुका, महालक्ष्मी अंबाबाई, एकवीरा आणि गोव्याच्या शांतादुर्गेसह इतर काही कुलदेवतांचा या ग्रंथात विचार करण्यात आलेला आहे. हा विचार करताना या विविध देवदेवतांची ऐतिहासिक माहिती, त्यांचेसंबंधीचे कुलाचार, त्यांचे संदर्भात म्हटली जाणारी लोकगीते व सांगितल्या जाणाऱ्या कहाण्या लक्षात घेण्यात आल्या आहेत. त्यासाठी सव्वाशेच्यावर लोकांचे हातभार लागलेले आहेत.

ग्रंथ सचित्र असून संशोधनात्मक व दुर्मिळ वाटावा असा आहे. या ग्रंथात अनेक मान्यवरांचे अभ्यासपूर्ण लेखही आहेत. ग्रंथाचा विषय जनमानसात लोकप्रिय असल्याने या ग्रंथाची अपूर्वाई आणखीनच आगळी आहे.

**(या ग्रंथाची ही आवृत्ती संपलेली आहे.)**

प्रकाशक : **महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समितीच्या वतीने महाराष्ट्र शासनाच्या शिक्षण विभागातर्फे प्रकाशित.**

किंमत : **पंधरा रुपये.**

पृष्ठ संख्या : ८७६.

## स्त्रियांचे खेळ आणि गाणी (पुष्प २० वे)

संपादन व प्रस्तावना : डॉ. सरोजिनी बाबर

चित्रकार : श्री. दीनानाथ दलाल व श्री. ग. ना. जाधव

प्रकाशनकाल : १ मे १९७७

सणासुदीच्या निमित्तानं, पूजेअर्चेच्या कारणानं आणि उत्सव प्रसंगांच्या निमंत्रणानं बायकामाणसं व मुलीबाळी एकत्र आल्या म्हणजे अनेक प्रकारचे वाडवडिलार्जित खेळ खेळतात. गाणी म्हणतात. अशा वेळी इष्टमैत्रीतल्या, गणगोतातल्या आणि सोयऱ्या-धायऱ्यातल्या सख्या साजणींचा मेळा जमलेला असतो. त्यामुळं स्थळकाळाचं आणि वयाचं भान विसरून घरोघरीची अंगणं या खेळ गाण्यांनी बेभान होत घुमती रहातात. रात्री अपरात्री उत्साहानं या जनजागरणात सामील होतात. अवतीभोवतीचं वातावरण धुंद करून सोडतात.

त्यावेळी खेळणारांचे अंग चवळीच्या शेंगेगत लवतं रहातं न् मुखीची गीतगंगा अखंडपणानं वहाती रहावं म्हणते. हातातल्या बांगड्यांच्या न् पायातल्या पैंजण वाळ्यांच्या झिनझिनकारानं गात्या गळ्याला उभारी येते. हातापायांच्या ठेक्यांनी गीताला ताल साधता येतो. पाठांतरातल्या न् आठवणीतल्या गीतांच्या उपस्यानं माणूस खेळतं रहातं. वयाला माघार घ्यावीशी वाटते. थकव्याला पुढं यायची हिंमतच होत नाही.

घरोघरीच्या मुलीबाळी न् बायकामाणसं जे विविध प्रकारचे खेळ खेळतात व त्यावेळी जी निरनिराळी गीते गातात त्यांचाच संग्रह या ग्रंथात केलेला आहे. हे पुस्तक सचित्र असल्याने नव्या पिढीला फार उपयुक्त असून संदर्भ ग्रंथ म्हणूनही वैशिष्ट्यपूर्ण झाले आहे.

प्रकाशक : **महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती, शिक्षण संचालनालय, पुणे.**

किंमत : **नऊ रुपये पंच्याहत्तर पैसे**

पृष्ठ संख्या : **२१०.**

## रांगोळी (पुष्प २१ वे)

संपादन व प्रास्ताविक : डॉ. सरोजिनी बाबर

चित्रकार : श्री. ग. ना. जाधव

प्रकाशनकाल : २६ जानेवारी १९७९

सणासुदीच्या निमित्तानं अगर मंगलकार्याच्या कारणानं घरात सडारांगोळी व्हावी हा परंपरेने आवर्जून पाळला गेलेला एक कुळधर्म आहे. रोजच्या रोज देवापुढं व तुळशीपुढं रांगोळी काढली गेली पाहिजे हा मराठी माणसाचा कुळाचार आहे. विशेषतः स्त्रियांनी आपली पारंपारिक चालरीत म्हणून तो मनापासून स्वीकारलेला आहे.

त्यामुळे एकेकाळी लोकप्रिय झालेल्या व पिढ्यान् पिढ्यांचा स्त्रियांनी हाताळलेल्या ठिपक्यांच्या रांगोळ्या या पुस्तकात समाविष्ट करण्यात आलेल्या आहेत. तसेच या विविध रांगोळ्यांपैकी काहींचा इतिहासही देण्याचा इथं प्रयत्न झालेला आहे.

पुस्तक सचित्र असल्यानं फारच लोकप्रिय झाले असून लोककलेचा एक उत्तम संदर्भ ग्रंथ म्हणून मान्यता पावलेले आहे.

प्रकाशक : **महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समितीच्या वतीने महाराष्ट्र शासनाच्या शिक्षण विभागातर्फे प्रकाशित.**

किंमत : **सात रुपये पंचाहत्तर पैसे**

पृष्ठ संख्या : ९६.

• • •